# अंकुर

[ कथासंग्रह ]

" साहित्य सहकार "
फर्ग्युसन कॉलेज, पुणें

प्रकाशक

**मॉडर्न बुक डेपो**

आनंदाश्रमासमोर, पुणें २

१९३९ ]     [ किं. १२ आणे

# अनुक्रमणिका

# निवेदन—

फर्ग्युसन कॉलेजांतील 'साहित्य-सहकार' या संस्थेच्या सदस्यांनीं लिहिलेल्या ललित कृतींचा हा पहिलाच संग्रह आज आम्ही रसिक वाचकांपुढें ठेवीत आहोंत.

साहित्य-सहकार मंडळाची स्थापना होऊन ( ३० जून १९३८ ) आज बरोबर सहा महिने झाले. एवढ्या अवधींत मंडळाच्या वीस एक बैठकी झाल्या. त्यांत मंडळाच्या उद्देशाप्रमाणें **'होतकरू लेखकांच्या मार्गांतील बौद्धिक अडचणी दूर करून त्यांचें लेखन शक्य तोंवर निर्दोष व उच्चतर करणें ' यासंबंधीं** मंडळानें यथाशक्ति, यथामति चर्चेच्या रूपानें जो प्रयत्न केला, त्याचेंच दृश्य स्वरूप म्हणून आज हा '**अंकुर**' प्रकाशाकरतां जमिनींतून वर डोकावूं पहात आहे.

हें पुस्तक काढण्यांत केवळ हौसेखातर लेखन करणाऱ्या होतकरू लेखकांना उत्तेजन देण्याचाच हेतू आहे. अध्ययन किंवा अध्यापनाचें स्वकर्तव्य पूर्णपणें संभाळून, फावल्या वेळीं काव्यशास्त्रविनोदांत जो आनंदाचा काल सदस्यांनीं घालवला त्याचें प्रतीक म्हणून ही कृति रसिकांपुढें आम्ही ठेवीत आहोंत.

या कामीं मंडळाचे अध्यक्ष गुरुवर्य श्री. नि. चापेकर आणि खिलाडू वृत्तीचे प्राध्यापक डॉ. न. का. घारपुरे, भा. म. गोरे, आणि मा. का. देशपांडे यांनीं अत्यंत आपलेपणानें आम्हांला वेळोवेळी मदत केली याबद्दल आम्ही त्यांचे मनःपूर्वक आभारी आहोंत. त्यांनीं आपल्या ज्ञानाचा व अनुभवाचा फायदा उदारपणें संस्थेला दिला; यामुळेंच ही अल्प कृति आज वाचकांपुढें येऊं शकत आहे. त्याचप्रमाणें मंडळांतील सर्व सदस्यांनीं प्रत्येक बाबतींत आमच्याशीं सहकार्य केलें याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत. ज्या लेखकांनीं लेख देऊन ह्या पुस्तक-प्रकाशनाच्या कामीं साह्य केलें त्यांचे आभार कसे मानावेत हेंच आम्हाला कळत नाहीं. त्याचप्रमाणें प्रो. देशपांडे व प्रो. घारपुरे यांच्या गोष्टी अनुक्रमें 'स्त्री' व 'ध्रुव' या मासिकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत. त्या गोष्टी पुस्तकांत ग्रथित

करण्याला त्या त्या मासिकांच्या संपादकांनीं आह्माला परवानगी दिली याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत. आमच्या पहिल्याच पुस्तकाचें प्रकाशनकार्य 'मॉडर्न बुकडेपो'चे श्री. ना. त्रिं. भिडे, बी. ए., यांनीं मोठ्या हौसेनें अंगिकारिलें याबद्दल त्यांचे व पुस्तक छपाई उत्कृष्ट ठेवून शक्य तितक्या लवकर पुस्तक छापून दिलें याबद्दल 'समर्थ भारत' छापखान्याचे चालक श्री. स. रा. सरदेसाई, बीं. ए., एल्एल्. बी., यांचे आम्ही फार आभारी आहोंत.

तसेंच कव्हर पेजवरील चित्र श्री. माळी यांनीं काढलेलें आहे, त्याचा उपयोग करण्याची त्यांनीं परवानगी दिल्याबद्दल त्यांचेहि आम्ही आभारी आहोंत.

शेवटीं, 'वेडेंवाकुडें गाईन, दास तुझा म्हणवीन' या भावनेनें सरस्वतीच्या क्रीडोद्यानांत लावलेल्या ह्या नवोदित बीजांकुराचें, उमललेल्या पुष्पाप्रमाणेंच रसिक कौतुकानें स्वागत करतील अशी आशा व्यक्त करून आम्ही रसिकांची रजा घेतों.

मकर-संक्रांत,
पौष व. ९, शके १८६१

आपले नम्र

'साहित्य-सहकार' चे नियोजक
हरी श्रीधर शेणोलीकर.
मुरलीधर गजानन पानसे.
श्रीपाद रघुनाथ भिडे.

---

प्रकाशक : ना. त्र्यं. भिडे, बी. ए., मॉडर्न बुक डेपो, पुणें २.

मुद्रक : सदाशिव रामचंद्र सरदेसाई, बी. ए., एल्एल्. बी., नवीन समर्थ विद्यालयाचा 'समर्थ भारत' छापखाना, ४१ बुधवार, पुणें २

# १ अभिनंदनीय विवाह

प्रो. डॉ. न. का. घारपुरे,

एम्.ए., एलएल.बी., पीएच.डी.

" अरे प्रभाकर, त्या कमलाकान्त गोखल्याचा म्हणे काल त्या कमल रानडेशीं अभिनंदनीय विवाह झाला ! "

" माधव, कोण रे हा कमलाकान्त ?"

" अरे तो रे, फायनल एम्. बी. बी. एस्. ला आहे तो. आपल्या कॉलेज मॅगेझीनमध्ये 'कमलाकान्त?' या प्रश्नचिन्हांकित नांवानं प्रेमकाव्यं लिहितो तो."

" हां हां, तो होय. बेट्याला कमलेचा कान्त होण्याची इच्छा होती तर एकूण. कुठंतरी घोडं पेंड खात असलं पाहिजे म्हणूनच स्वारी नांवापुढं प्रश्नचिन्ह करीत होती. बरं मग, त्याचं काय बुवा ?"

" त्याचं काय म्हणजे ! अरे त्या कविराज कमलाकान्ताचं काल त्या कमल रानडेशीं लग्न झालं. आश्चर्य आहे. 'अभिनंदनीय विवाह' या मथळ्याखालीं वृत्तपत्रांनींहि ह्या विवाहाची बरीच जाहिरात केली आहे."

" मग त्यांत आश्चर्य कसलं बुवा ? तो कां मिश्रविवाह, कां पुनर्विवाह, कां रजिस्टर विवाह, कां प्रेमविवाह आहे म्हणून वर्तमानपत्रांनीं त्याला अभिनंदनीय ठरविलं ?"

" अरे बाबा, हीच तर गंमत आहे. मिश्रविवाह नाहीं नि पुर्नविवाह नाहीं. दोघेंहि कोकणस्थ ब्राह्मण व दोघेंहि आतांपर्यंत अविवाहित. रजिस्टर पद्धतीचं तर नांवच काढूं नकोस. अगदीं अग्निब्राह्मणांसमक्ष होमादि धार्मिक विधि करून वैदिक पद्धतीनं हा विवाह झाला आहे."

" काय म्हणतोस ! असं असूनसुद्धां वर्तमानपत्रांनीं त्याला अभिनंदनीय ठरवून त्याचं वर्णनहि केलं आहे ? म्हणजे हीं सगळीं वर्तमानपत्रं सनातनी झालीं कीं काय ?"

" कांहीं जरी असलं तरी हा विवाह अभिनंदनीय आहे खास ! कुठं कमल रानडे नि कुठं हा कमलाकान्त गोखले ! कमल रानडे आज बी. ए. असून रॅंग्लर व टी. डी. झाली आहे. कनकपूर संस्थानांतील महाराणी

कॉलेजची ती प्रिन्सिपॉल आहे. शिवाय कमलाकान्तापेक्षां कितीतरी जास्त श्रीमंत व वयानंहि मोठी!"

"मग ती कमल म्हणजे असेल झालं कोळशांतलं माणिक. कमलाकान्ताच्या प्रेमकाव्यांवर नि सुंदर, देखण्या चेहऱ्यावर भुलली असेल झालं."

"कमल कांहीं तशी कुरूप नाहीं. तिच्यापेक्षां जास्त शिकलेला, निदान तिच्याइतका शिकलेला तरी पति तिला खास मिळाला असता. गरीबीचं एक असूं दे. पण आपल्यापेक्षां कमी शिकलेला, वयानं लहान व अगदींच पोरका असा कमलाकान्त कसा तिनं पसंत केला?"

"अरे, विलायतेला जाऊन आलेल्या पोरी अशाच लहरी असतात. कमी शिकलेला नवरा असला म्हणजे त्याला कसंहि नंदीबैलाप्रमाणं नाचवावं! त्याचा प्रेमविवाह आहे असं म्हणावं तर तो रजिस्टर पद्धतीनं न होतां वैदिक पद्धतीनं कसा झाला ह्याचंच मला आश्चर्य वाटतं आहे."

"कमलाकान्त तसा स्वाभिमानी आहे. कांहीं असलं तरी बेट्यानं नशीब काढलं खरं! सुशिक्षित, पैसे मिळविणारी, श्रीमंत मुलगी लाटलीन खरी!"

"त्याला नव्हे लागते बाबा! उगीच नाहीं. बाकी या विवाहांत कांहीं तरी गौडबंगाल दिसतंय!"

* * *

नेहमींच्या संवयीप्रमाणं मी आज संध्याकाळींहि फिरायला गेलें होतें व बाजूला एका शीलातलावर बसलें होतें. फिरायला जातांना माझ्याहि डोक्यांत कमलच्या लग्नासंबंधींच विचार चालले होते. इथं येऊन बसतें तों वरील संवाद ऐकायला मिळाला. कमलच्या लग्नासंबंधीं मलाच आश्चर्य वाटत आहे असं नसून या वर्तमानपत्रांत गाजून राहिलेल्या अभिनंदनीय विवाहासंबंधीं इतरांनाहि कुतूहल आहे तर! कमलची मी लहानपणापासूनची मैत्रीण. बी. ए.पर्यंतचं दोघींचं शिक्षण एकाच कॉलेजांत झालेलं. वर्गांतसुद्धां आम्ही एकाच बाकावर बसायच्या. बी. ए. ला कमलनं गणित व मीं मराठी घेतलं असल्यामुळं त्या तासापुरत्याच आम्ही निरनिराळ्या वर्गांत बसत असूं तेवढ्याच! कमलच्या घरींहि माझं जाणं येणं असे. तिच्या घरीं ती, तिचे वडील बाबासाहेब व त्यांनीं बाळगलेला पोरका कमलाकान्त एवढीच काय ती मंडळी. नाहीं म्हणायला इतर नोकरचाकर काय घरांत वावरत असतील

तेवढेच. कमलच्या घरांत नेहमीं शांतता असे. कधीं गडबड म्हणून दिसायचीच नाहीं. साहजिकच आहे. सगळीं माणसं सडीं, घरांत मूल वगैरे कुणीच नाहीं. कमल बाबासाहेबांची एकुलती एक मुलगी. बाबासाहेबांची पत्नी निवर्तल्याला बरींच वर्षे झालीं होतीं. त्यांनीं कमलला सावत्र आईहि आणली नाहीं. बाबासाहेबांना चांगलं महिना चारशें रुपये पेन्शन मिळत असे. पण त्यांचा चेहरा मात्र नेहमीं जरासा उदासीन, करारी व गंभीर दिसे. कमलला शिकण्याची मोठी हौस. बी. ए. झाल्यावर ती रॅंग्लर व टी. डी. होण्यासाठीं इंग्लंडला गेली व मी बी. टी. होऊन एका स्थानिक कन्याशाळेंत शिक्षिका होतें. आतां कमल एका कॉलेजची प्रिन्सिपॉल होती. नोकरी करण्याची तिला कांहींच जरूरी नव्हती. परंतु तिचे स्वातंत्र्यासंबंधींचे विचार मला माहित असल्यामुळें तिच्या नोकरीसंबंधीं मला विशेष असं कांहीं आश्चर्य वाटलं नाहीं. इंग्लंडांत तीन चार वर्षे काढलेलीं व इतकी शिकलेली. तेव्हां ती कुणीतरी एखादा आयु. सी. एस्. किंवा एखादा मोटारवाला, लठ्ठ पगाराचा सरकारी अधिकारी नवरा पटकावील असं मला वाटत होतं. कॉलेजांत असतांना विवाहासंबंधीं कधीं कधीं चर्चा होई; परंतु त्यासंबंधीं ठाम मत मांडण्याचं ती बहुतेक टाळीतच असे. बाकी त्या वयांत व काळांत ठाम मतं तरी कशीं सांगतां येतील ? तिनं ज्या कमलाकान्ताशीं लग्न केलं, तो म्हणजे रस्त्यावर टाकलेला पोरका मुलगा ! बाबासाहेबांनींच त्याला आतां-पर्यंत पाळलं, त्याचं शिक्षण केलं. कमलच्यापेक्षां तो कितीतरी कमी शिकलेला. ५।६ वर्षांनीं तिच्यापेक्षां लहान. लग्न झालं त्याचाहि विशेषसा गाजावाजा नाहीं. काय आमच्यासारखीं ओळखीचीं किंवा ऋणानुबंधांतलीं ५।२५ मांणसं बोलावलीं असतील तेवढींच. वर्तमानपत्रांनीं जर या लग्नाची हकीकत दिली नसती तर लग्न झाल्याचंहि कुणास कळलं नसतं. वर्तमानपत्रांना काय! जराशी चमत्कारिक गोष्ट वाटली, दिली तिला प्रसिद्धि. कमलनं वैदिक पद्धतीच्या विवाहाला संमति द्यावी, बाबासाहेबांनींहि ह्यांत आनंद मानावा, मला सगळीच घटना मोठी चमत्कारिक वाटूं लागली. कमल इंग्लंडला गेल्यापासून मात्र तिचं व माझं फारसं बोलणं झालं नाहीं. बाकी तसा वेळच सांपडला नाहीं म्हणा. आम्ही बी. ए. च्या वर्गांत होतों तेव्हां कुठं कमला-कान्त मॅट्रिक झाला. आमच्याबरोबर तो फिरायला येत नसे. समजूं लागल्या-

पासून आपण गरीब आहोंत ह्याची जाणीव त्याच्या मनाला झाली असल्यास न कळे. पण तो आमच्यांत विशेष मिसळत नसे. मलाहि त्याचं आश्चर्य वाटलं नाहीं. एक तर तो लहान; शिवाय नुकताच कुठं मॅट्रिक झालेला. माझ्या डोक्यांत विचारांचं नुसतं काहूर माजून राहिलं होतं.

* * *

संध्याकाळ बरीच झाली होती. माझ्या विचारांच्या तंद्रींत मी घराकडे चाललें होतें. एका कोंपऱ्यावर मला बरीच गर्दी दिसली. मीहि थबकलें. टांचा उंच करून कुतूहलानें मी पाहूं लागलें. मनाला एकदम चरका बसला. नुकताच जन्मलेला मुलगा मारून टाकलेला तिथं पडलेला होता. एकदोन पोलीस पंचनामा करण्याच्या गडबडींत होते. मी थोडीशी मागं सरलें व पुढं घराकडे जाणार तोंच बाबा काठी टेकीत टेकीत तिथं येतांना दिसले. " काय विमलाताई, कसली गडबड आहे ?" ते म्हणाले. पण माझ्यानं बोलवेना देखील. बाबासाहेबांनीं तें दृश्य पाहिलं—ज्याची पुरती नाळसुद्धां कापली नाहीं असा तो मेलेला मुलगा...एकंदर तें हृदयद्रावक दृश्य पाहून त्यांचा चेहरा खरकन् उतरला व त्यांना घेरी आल्यासारखं वाटूं लागलं. ते मला म्हणाले, "विमलाताई, मला घेरी येती आहे ग." असं म्हणतच ते मटकन् खालीं बसले. मीं लागलीच त्यांना माझ्या हाताचा आधार दिला, जाणाऱ्या टांग्यास थांबवून, त्यांना टांग्यांत घालून घरीं आणलं. कमल व कमलाकान्त अजून घरीं आले नसल्यामुळं बाबासाहेबांच्या गड्यामार्फत मीं माझ्या घरीं निरोप पाठवला. दहा-बीस मिनिटांतच तीं दोघें आलीं. कमलाकान्तानं बाबासाहेबांची नाडी तपासली व थोडंसं दूध प्यायला देऊन स्वस्थ पडावयास सांगितलं. त्यांच्या मनाला कांहींतरी धक्का बसला असला पाहिजे असं तो म्हणाला. थोड्याच वेळानं मी घरीं जायला निघालें. परंतु कमलनं व कमलाकान्तानं फारच आग्रह केल्यामुळं व त्यांत बाबासाहेबांच्या आग्रहाचीहि भर पडल्यामुळं मला तिथं राहणं भागच पडलं. " विमलाताई, मी तुझ्या घरीं निरोप पाठवतों कीं, मीं तुला आज इथं आमच्याकडं राहवून घेतलं आहे. शिवाय उद्यां रविवारच आहे. तेव्हां शाळेचीहि तसदी नाहीं." बाबासाहेबच असं म्हणाल्यामुळं माझा नाइलाज झाला. रात्रीं बाबासाहेबांना चांगलाच ताप भरला. त्यांत ते "... कमला-कान्त...टाकलेला मुलगा...कमल...भागिरथी...नको,अशी रडूं नकोस ..

मीच पापी " वगैरे कांहींतरी असंबद्ध बडबडत होते. संध्याकाळच्या त्या प्रसंगाचा त्यांच्या मनावर बराच परिणाम झाला होता असं स्पष्ट दिसत होतं. आम्ही दोघीहि त्यांच्या शेजारींच बसलों होतों. पहाटे पहाटे त्यांना झोंप लागली व सकाळीं त्यांचा तापहि उतरला.

* * *

सकाळीं मुखमार्जनादि आटोपल्यावर जाण्याविषयीं मीं पुन्हां परवानगी मागितली. कमल म्हणते, " रहा ग आजच्या दिवस. रविवार तर आहे. काल तुझी बाबांना केवढी मदत झाली आहे." " त्यांत काय आहे विशेष? पण तुमच्या लग्नाबद्दल तुमचं अभिनंदन करायचं मी अगदींच विसरून गेलें." मी एवढं म्हणतें तोंच कमलाकान्त तिथं आला. त्यानं माझं म्हणणं ऐकलं वाटतं. कारण तो लगेच म्हणाला, " कां बुवा? अभिनंदन करण्या-सारखं एवढं काय आहे त्यांत? " बाबासाहेबांना आतां बरीच हुशारी वाटत होती. चहा वगैरे घेऊन ते तिथंच पलंगावर बसले होते. मलाहि त्यामुळें बोलण्याला जरा धीर आला. " नाहीं कसं? वर्तमानपत्रांनीं उगीचच कां अभिनंदन केलं आहे? शिवाय तरुण मंडळींतहि तुमचा विवाह हा एक चर्चेचा विषय होऊन बसला आहे. काल फिरायला गेलें होतें, तिथेंच मला ही चर्चा ऐकायला मिळाली." मी म्हणालें.

" काय काय मुक्ताफळं गाळीत होती तरुण मंडळी?" कमलनं उपहासानं विचारलं.

" कमलसारख्या एवढ्या शिकलेल्या श्रीमंत मुलीनं कमलाकान्तासारख्या कमी शिकलेल्या, वयानं लहान अशा गरीब तरुणाशीं वैदिक पद्धतीनं विवाह करावा म्हणजे आश्चर्यच नाहीं कां? " मी जरा स्पष्टच म्हणालें.

" अग त्यांत आश्चर्य कसलं? आमचा हा प्रेमविवाह आहे. प्रेम-विवाहाची तर सध्यां कोण लाट पसरली आहे! " कमल उपहासानं म्हणाली.

" तें खरं! पण प्रेमविवाह रजिस्टरपद्धतीनं व्हावा लागतो ना? " मी जरा टोंचून बोललें.

" बरोबरच आहे. घटस्फोटाची अगाऊ तयारी करण्याकरितांच ना? प्रेमविवाहाच्या वेळीं आंधळं असलेलं प्रेम विवाह झाल्यावर डोळस होऊं लागतं, नि मग एकमेकांना एकमेकांचे दोष दिसायला लागतात. पुढं या

लग्नांतून निसटतां यावं—घटस्फोट घेतां यावा—म्हणूनच आज रजिस्टर लग्न करायचं ना ? यावरूनच वधूवरांच्या एकमेकांवरच्या प्रेमाची कसोटी होती आहे. मला वाटतं प्रेमविवाह—जर तो अस्सल असेल—तर—तो वैदिक पद्धतीनंच झाला पाहिजे. घटस्फोटाची तयारी करून ठेवणाऱ्या रजिस्टर पद्धतीनं प्रेमविवाह करणाऱ्या वधूवरांचं एकतर एकमेकांवर खरंखुरं प्रेमच नसलं पाहिजे; किंवा तें स्वार्थी,क्षुद्र, अतएव ती खऱ्या प्रेमाची विटंबनाच असली पाहिजे." कमलाकान्त खवळून म्हणाला.

"वैदिकपद्धतीच्या लग्नांत होमाच्या धुराचा त्रास होतो तर रजिस्टर विवाहाचे वेळीं रजिस्टरसाहेबांच्या सिगारेटच्या धुराचा त्रास होतो." कमल टवाळी करण्याच्या उद्देशानं म्हणाली.

"खऱ्या खेळाडूंचे संघ खेळत असले तर त्यांना सरपंचांची जरूरी ती काय ? सरपंचांचें अस्तित्व म्हणजेच खेडाळूंतील खऱ्या खेळाडू वृत्तीचा अभाव. तसंच राजिस्टरपद्धतीनं केलेला प्रेमविवाह म्हणजे वधूवरांमधील प्रेमाभावाचं द्योतकच समजावं." कमलाकान्तानं आपला निर्णय दिला.

या दोघांचे हे विचार ऐकून मी तर अगदीं थक्कच झालें. कमल पुढं म्हणाली, "लोकांचा आक्षेप काय तर मी माझ्यापेक्षां कमी शिकलेल्याशीं व गरीबाशीं किंबहुना बाबांनीं पोरका म्हणून बाळगलेल्या मुलाशीं लग्न लावलं. पुढं काय तर तो माझ्यापेक्षां वयानं लहान .आहे. कमलाकान्त व मी—आम्ही दोघें एकमेकांना आज लहानपणापासून माहीत आहों, एका घरांत वावरत आहोंत, आमच्या आवडीनिवडी एकमेकांना ठाऊक आहेत. कमलाकान्ताचा बाबांना मोठा आधार वाटतो. वेळप्रसंगीं त्यानंच खस्ता खाल्ल्या आहेत. आमचं एकमेकांवर प्रेम आहे. असं असतांना व बाबांचीहि या लग्नाला पूर्ण संमति असतांना, किंबहुना थोडासा आग्रहहि असतांना सामाजिक विषमतेच्या काल्पनिक बाबींच्या आहारीं जाऊन आम्हीं लग्न करू नये काय ? कमलाकान्तानं आपलं प्रेम माझ्याजवळ बोलून दाखविण्याचं धाडस न करणं म्हणजे सुद्धां त्याच्या मानी मनाला न्यूनगंडाची लागलेली एक संवय होती. कमलाकान्त आज माझ्याएवढा शिकलेला नसेल तर यापुढें कदाचित् तो माझ्यापेक्षां जास्त शिकेल. आणि शिक्षणानं जर मन सुसंस्कृत व्हायचं नसेल तर शैक्षणिक पदव्यांचं तें लटांबर नि ओझं तरी

कशाला ? तो गरीब असला तर आपल्या कर्तबगारीवर श्रीमंत होईल, आणि जरी तो श्रीमंत झाला नाहीं तरी मी श्रीमंत आहे ना. नुसत्या पैशावरच कां सौख्य अवलंबून आहे ? तो माझ्यापेक्षां ४।५ वर्षांनीं लहान आहे त्याचा एवढा ऊहापोह कशाला ? चांगल्या घरंदाज कुळांतील तरुणानं वेश्येच्या मुलीशी लग्न करून पतितोद्धाराचा टेंभा मिरवावा आणि मीं ज्याचे आईबाप माहीत नाहींत, परंतु जन्मापासून जो उच्च वातावरणांत वाढला आहे अशाशीं लग्न केलें तर लोकांच्या नाकाला मिरच्या झोंबाव्यात काय ? " कमल त्वेषानं व चिडून म्हणाली.

हें सर्व ऐकून मला तर आश्चर्य वाटलंच पण कमलकान्त व बाबासाहेब यांचेहि चेहरे गंभीर झाले. त्या खोलींत त्या वेळीं फारच गंभीर वातावरण पसरलं होतं. कमलनं केलेल्या भाषणाचा परिणाम प्रत्येकाच्या मुखचर्येवर प्रतीत झाला होता. इतका वेळ बाबासाहेब स्तब्धच होते, परंतु आतां त्यांच्याच्यानं राहवेना. ते क्षीण परंतु स्पष्ट आवाजांत म्हणाले, " विमलाताई, कमल, कमलाकान्त, तुम्ही तिघेंहि सुशिक्षित नि सुज्ञ आहांत. कालच्या सायंकाळच्या प्रसंगानं माझ्याहि मनावर विलक्षणच परिणाम झाला."

" होय बाबा, काल रात्रीं तुम्हीं टाकलेला मुलगा, भागिरथी, मीच पापी, असं कांहींतरी बडबडत होतां," कमल शांतपणें म्हणाली. " होय बाळ, तेंच मी आतां सांगणार आहें. तुमच्या लग्नाला मींच संमति दिली व त्यामुळं तरी कमलाकान्ताला त्याच्या कुळासंबंधीं न्यूनगंडाची लागलेली बोचणी संपेल असंच मला वाटलं. आतां विषय निघालाच आहे. केव्हां तरी मला तें तुम्हां दोघांना सांगायचंच होतं. विमलाताईहि आहे. ठीकच झालं. कमलाकान्ताचं जन्मरहस्य सगळ्यांना ठाऊक आहेच. काल संध्याकाळीं जसा एक टाकलेला मुलगा मीं पाहिला, तसाच प्रकार २२ वर्षांच्या मागं एकदां घडला. त्या वेळींहि पोलीस पंचनामा करीत होते. मुलगा मात्र जिवंत होता. मुलासंबंधीं कुणीच कांहीं बोलेना. शेवटीं त्या मुलाचं पालनपोषण मी करीन असं सांगून मीं तो घरीं आणला. त्याच्या कपड्यात 'गोखले' एवढींच अक्षरें लिहिलेली चिठ्ठी मला सांपडली. तोच हा आमचा कमलाकान्त गोखले. जग हें नुसतं तमाशा पाहणारं आहे. कमल, तूं जरी टाकलेली मुलगी नसलीस तरी तुझ्या जन्मरहस्याच्या बाबतींतहि थोडासा तसाच प्रकार आहे."

बाबासाहेबांना दम लागल्यामुळें ते थोडेसे थांबले व पुन्हां बोलूं लागले, " माझ्या पत्नीला चार मुलं झालीं परंतु तीं चारींहि मरण पावलीं. तिचं बाळंतपण म्हणजे तिचा पुनर्जन्मच म्हणायचा! चौथ्या खेपेस ती बाळंत झाली, मूल नेहमींप्रमाणं गेलंच. तीहि अंथरुणाला खिळली. दिवसेंदिवस ती खंगतच चालली. तिच्या शुश्रूषेसाठीं मी एक ब्राह्मणाची अनाथ विधवा स्त्री ठेवली होती. दोन वर्षांच्या सतत आजारीपणानंतर माझ्या पत्नीनं या जगाचा शेवटचा निरोप घेतला. त्या वेळीं मी उत्तर हिंदुस्थानकडं नोकरीला होतों. बायको मेल्यावरसुद्धां मीं त्या विधवा स्त्रीस घरकामाकरितां ठेवून घेतली. तीहि गरीब व अनाथ होती. तिनं तरी जगांत कुठं जावं? जीव लावून तिनं माझ्या पत्नीची सेवा केली होती. माझीहि ती योग्य ती काळजी घेत असे. मनुष्याचं मनच असं कांहीं दुबळं असतं कीं कांहीं कांहीं गोष्टी सहज घडून येतात. आम्हांला एकमेकांना एकमेकां-विषयीं ओढा वाटूं लागला. मी तिच्याशी पुनर्विवाह लावण्यास तयार होतों, परंतु या गोष्टीला तीच तयार नव्हती. त्या वेळीं पुनर्विवाह समाजांत इतका रूढ नव्हता व त्यामुळें माझ्या नांवाला व हुद्याला कमीपणा येईल असं ती म्हणे. शेवटीं व्हायचं तेंच झालं. आपण गर्भवती आहोंत असं समजल्यापासून ती दुःखीकष्टी दिसूं लागली. मी तिला नेहमीं धीर देत होतों. प्रसूतीसंबंधीं मी योग्य ती व्यवस्था करीन, आपण पुनर्विवाह करूं, असं मीं तिला पुष्कळ वेळां सांगितलं, पण माझ्याकरितां तुमच्या अब्रूचे धिंडवडे नकोत हा आपला हट्ट ती सोडीना. शेवटीं तुझ्या पुनर्विवाह न करण्यानेंच माझे जास्त धिंडवडे निघतील असंहि मी सांगितलं. मी माझी जबाबदारी टाळण्यास मुळींच तयार नव्हतों. शेवटीं एके दिवशीं तीं नाहींशी झाली. तीनचार दिवसांनीं 'एका गर्भवती स्त्रीनें केलेला आत्म-हत्येचा प्रयत्न' या सदराखालीं मीं वर्तमानपत्रांत मजकूर वाचला. ज्या गांवीं जाऊन तिनं आत्महत्येचा प्रयत्न केला होता तिथं मी शोधहि केला. पण कांहींच पत्ता लागेना. तिला आतां आठवा महिना लागून गेला होता. आणखी चार महिने असेच गेले. त्या काळांत माझ्या मनाची स्थिति अत्यंत केविलवाणी झाली होती. मला काय करावं हेंच सुचेना. शेवटीं एका गांवांतील अनाथाश्रमांतून मला एक पत्र आलं व त्यांत मला एकदां भेटून

जा अशी तिनं विनवणी केली होती. मी ताबडतोब तिकडे गेलों. पाहतों तों ती बिछान्यावर आसन्नमरण स्थितींत पडली होती. तिला पाहिल्यावर 'भागिरथी, अशी रडूं नकोस' असं मी मोठ्या कळवळ्यानं म्हणालों. भागिरथीनं शेवटीं सगळी हकीगत सांगितली. माझ्या अब्रु-रक्षणाकरतां तिनं जीव देण्याचं ठरवलं—वेडी समजूत बिचारीची—पण त्यांत यश आलं नाहीं. पोलिसांनीं तिला अनाथाश्रमांत आणून ठेवली. तिथं ती बाळंत झाली व तिला मुलगी झाली. तीच तूं कमल. मुलगी तीन महिन्यांची होती. भागिरथी मात्र खंगत चालली. आपण आतां जगत नाहीं असं वाट-ल्यावर तिनं अनाथाश्रमाच्या चालकांकडून मला पत्र लिहवलं. माझं नांव तिनं कोणत्याहि परिस्थितींत कुणाला सांगितलं नाहीं. कमल दुसऱ्या एका लहानशा बिछान्यावर निजली होती. किती गोजिरवाणी पोर दिसली मला. भागिरथीनं मला कमलची काळजी घेण्यासंबंधीं विनवलं. 'भागिरथी, असं कां म्हणतेस ? कमल माझीच मुलगी आहे, मी तिची काळजी घेईनच. पण तूं अशी पळून कां गेलीस ?' मीं विचारलं. 'माझं पाप मलाच निस्तरायला नको कां ? माझ्यासारखी यःकश्चित् क्षुद्र स्त्री मेली म्हणून काय झालं ? पण माझ्याकरतां आपली काय स्थिति झाली असती ?' असं ती म्हणाली. मला फारच वाईट वाटलं. 'भागिरथी, पाप आपण दोघांनींहि केलं आहे, असं पाहिजे तर म्हण. पण त्यांत पाप कसलं ? जगाला काय होतं नुसतीं नांवं ठेवायला ! पुनर्विवाह करून आपण आनंदांत राहिलों असतों. तुझ्या मनाच्या समजुतीकरितां तूं केवढं हें दिव्य केलंस ! तुझं हें आत्मबलिदानच तुझी थोरवी सिद्ध करीत आहे. नको, अशी रडूं नकोस.' मी पुनः धीर देण्याकरितां म्हणालों. तिनं माझा हात आपल्या निस्तेज हातांत घेतला व माझ्याकडे पहात तिनं प्राण सोडला. . . अनाथाश्रमाच्या चालकांना सांगून व कमलला घेऊन मी घरीं आलों. मला त्या प्रांतांत राहण्याचाहि अगदीं कंटाळा आला. खटपट करून शेवटीं मी माझी इकडील प्रांतांत बदली करून घेतली. माझी पत्नी चार मुलं होऊन गेली—भागिरथी गेली—पण कमल तरी मला लाभली !" बाबासाहेबांचा कंठ दाटून आला, त्यांना पुढं बोलवेना, त्यांच्या डोळ्यांतून खळकन् दुःखाश्रु खालीं पडले.

* * *

• मला, कमलला, कमलाकान्ताला रडूंच कोसळलं. पहिली उर्मि ओसरल्यावर मीं मनांत म्हटलं " अभिनंदनीय विवाह " वर्तमानपत्रं अभिनंदन करतात, लोक चर्चा करतात......पण अभिनंदनीय विवाह खराच !

---

# २ भावनेच्या भरांत

श्री. हरी श्रीधर शेणोलीकर ( वाङ्मयप्राज्ञ )

## १९३२—

शनिवारवाड्यापुढें माणसांचा नुसता समुद्र हेलावत होता. समुद्रांतील एखाद्या उंच खडकाप्रमाणें दिसणाऱ्या उच्च व्यासपीठावर महात्माजींची काळीसांवळी, कृश परंतु तेजस्वी आणि शांत मूर्ति हात जोडून उभी होती.

पन्नास हजार लोकांच्या गर्दींत मी कुठेंतरी दूरवर उभा होतों. महात्माजींच्या भाषणापैकीं थोडे तुटक हिंदी शब्द मला ऐकूं येत होते.—

" भाइयों ! दरिद्री नारायण का यह दीन सेवक आपके सामने खडा है. जनताकी सेवाके लिये, सत्याग्रहकी सेवाके लिये मैं भीक मॉंग रहा हूँ—क्या पूनाके भाइ और बहिन मेरी यह झोली भर देंगें ? "

हे शब्द मी ऐकत होतों. सर्व लोक ऐकत होते. ज्याला त्याला आपण कांहींतरी द्यावें असें वाटत होतें. पण हात उचलत नव्हता. मी माझ्या हातांतील सोन्याच्या रिस्टवॉचकडे पाहत होतों. इतक्यांत स्त्रियांमधून कोणसें उठलें, आणि एकदम गळ्यांतली एकदाणी देऊन टाकली तिनें. एकदम टाळ्यांचा कडकडाट झाला. मीं आश्चर्यानें तिच्याकडे पाहिलें, तों ती माझी सुधावहिनी होती ! तिच्या चेहेऱ्यावर कसलें तरी तेज दिसत होतें. महात्माजींनीं एकवार तिच्याकडे पाहून 'देवी' म्हणून हात जोडले आणि फिरून बोलूं लागले ते. मला वहिनीविषयीं अभिमान वाटूं लागला.

* * *

त्या दिवशीं नऊ वाजले घरीं यायला मला. सुधावहिनी माझ्याआधींच आली असावी. कारण अंगणांत पाऊल ठेवलें इतक्यांत आमच्या नानांचा चढता आवाज आला माझ्या कानावर.

"मोठे दिवे लावलेत देशभक्तीचे ! तुम्हांला काय होतंय दुसऱ्याच्या श्रमांवर मोठेपणा मिळवायला ! पण इथं एक एक पैसा मिळविण्याकरतां माझ्या हाताचे आंकडे वळतायत खर्डेघाशी करून आणि तिकडे तुमच्या नवऱ्याला-मऱ्याला-पक्षकारांशीं हुजत घालतां घालतां हाडाचीं काडें करावीं लागत असतील कराचीला समजलांत ! " नाना तावातावानें बोलत होते आणि वहिनी खालीं मान घालून दाराशीं उभी होती.

" आतां एवढें करा ह्या देशभक्तीच्या थेरांनीं आमच्या नोकऱ्या घालवूं नका म्हणजे मिळविली. नाहीतर सर्वांनाच चौपदरी घेऊन हिंडावं लागेल दारोदार ! "

वहिनीचे डोळे पाण्यानें भरून आले. मला राहवेना म्हणून मी म्हणालों, "नाना—" पण तोंड उघडतांच बंद झालें. नानांचें तोंड म्हणजे मशिनगनच एक. तिच्यापुढें कुणाची मात्रा चालायची नाहीं. "हं या, तुम्ही काय केलीत त्या गांधीला मदत ? रिस्टवॉच आहे का ? कां देऊन टाकलंत त्याला ? हो ! तुमच्या वहिनीला भिकेचे डोहाळे लागले, तसे तुम्हांला लागायचे! स्वातंत्र्य पाहिजे म्हणे ! कशाला ? आपसापसांत मारामाऱ्या करायला ?" नाना असेंच कांहींतरी रागारागानें बोलत होते. मी येतांच संधि साधून वहिनी तिथून निसटली. पण आंत जाते तों काय मशिनगनपुढून निघून मोठ्या तोफेच्या पुढें उभें राहिल्यासारखें झालें तिला.

" या–झाल्या कां भाऊजी-भावजयांच्या सभा न् बिभा ! आम्हांला चाकरच ठेवलंय तुमच्या तैनातीला. या, बसा पाटावर. गिळा एकदां ! " एकीकडे आईची बडबड चालूच होती. दुसरीकडे ती आम्हांला वाढीत होती. माझा पहिला भात संपला. वहिनी नुकतीच बसली होती.

" हें काय ! तुझा गळा मोकळा कसा असा ? घालून गेली होतीसना एकदाणी—? " वहिनी माझ्याकडे पाहूं लागली. मी कांहींच बोललों नाहीं. सभेंतल्या टाळ्यांच्या कडकडाटाशीं इथल्या गडगडाटाची तुलना करीत होतों मी खालीं मान घालून. इतक्यांत बाबा आंत आले. मग काय विचारतां !

आधींच आई संतापी अन् टाकटुकींत दिवस काढावे लागल्यानें पैशाच्या कामांत मोठी उदार (?).

" अहाहा ! काय अवदसा आठवली मेलीला ! जळलं तुझं तोंड. झालीस एकदांची लंकेची पार्वती ! " वाढतां वाढतां आमटीचें पातेलें वहिनीच्यापुढें आपटलेंन तिनें. " अग पण तुझी ही देशभक्ति आमच्या मुळावर कां ? माहेरीं आहे गडगंज संपत्ति ! तर बापाचें आणून द्यायचं होतंस कीं त्या गांधीला——"

आईचा तोफखाना सुरू झाल्यावर मग कसलं जेवण अन् काय ! कशी-बशी पोळी संपवून उठलोंच मी पानावरनं. वहिनीनें तर पोळीहि घेतली नव्हती. माझ्यामागोमागच आली ती आंचवायला. तिचे डोळे पाण्यानें भरले होते. " वहिनी——" मी कांहींतरी बोलणार होतों—इतक्यांत म्हशीचें दूध काढून समोरच्या गोठ्यांतून नाना इकडे येत होते. त्यांना पाहतांच मी एकदम खोली गांठली माझी.

* * *

अकरा वाजले असतील बहुधा. मी पुस्तक वाचीत पडलों होतों. दार लोटलेलें होतें, तें उघडून वहिनी आंत आली व माझ्या हातांतलें पुस्तक ओढून घेतलंन तिनें एकदम. मीं तिच्याकडे पाहिलें. ती हंसत होती. अगदीं समोरच्या फोटोंत मनोहरदादाजवळ बसलेली वहिनी जशी हंसत होती, तशीच—अगदीं तितक्याच आनंदानें वहिनी हंसत होती आतां. मला अचंबा वाटला आणि मीं वहिनीला विचारलें:

" वहिनी ! मघाच्या गडगडाटाचें तुला कांहींच वाटत नाहीं ? तूं हंसती आहेस खुशाल ? "

" भाऊजी, मेघांच्या गडगडाटाची भीति बोलघेवड्या राघूमैनांनाच वाटायची ! "

वहिनीनें माझ्या बोलघेवडेपणाला टोमणा मारला. पण मी हंसून म्हणालों, " हो ! कोण बोलघेवडें तें दिसतंच आहे. इथं चुरुचुरु बोलायला लागलीस आणि मग मघांशीं आई बोलतांना डोळ्यांतून गंगायमुना कां वाहत होत्या !"

" वा ! गडगडाटानंतर वृष्टि व्हायला नको वाटतं ? " दादाच्या फोटोकडे पहात ती म्हणाली. तिच्या विनोदी वृत्तीचें कौतुक वाटून मीहि हंसतच तिचें

वाक्य पूर्ण केलें. ''मग आतां वृष्टीनंतरची ही प्रसन्नता खेळती आहे म्हणायची!'' वहिनी अगदीं मनापासून हंसली आणि हंसतच म्हणाली, '' भाऊजी, तुम्ही कवि असतां तर फार चांगलं झालं असतं.''

'' वहिनी, '' मी थोडा गंभीर होऊन बोलूं लागलों. '' मी कधीं काळीं कवि झालों तर तूंच माझी स्फूर्तिदात्री होशील. आजहि तूंच माझी स्फूर्तिदात्री देवता आहेस. पण काव्यलेखनासारख्या निरुपयोगी कार्यापेक्षां किती तरी उज्ज्वल, सदुपयोगी नी पवित्र अशा राष्ट्रकार्याला तूं मला प्रवृत्त केलं आहेस. बस्स! वहिनी, झाला माझा निश्चय. मी कॉलेज सोडून सत्याग्रहांत शिरणार! ''

वहिनी एकदम गंभीर झाली. ''वेडे कुठले! बी. ए. ची परीक्षा जवळ येत चालली, जोरांत अभ्यास करायचा नी फर्स्टक्लास मिळवायचा गतवर्षीप्रमाणें; तें हें काय घेऊन बसलांत, नाहीं तेंच खूळ! आणि हें कसलें पुस्तक? ' दी रिबेलियन अगेन्स्ट डेस्पॉटिझम्.' भाऊजी, शेक्सपियर झाला कां वाचून? परवांच म्हणत होतां ना—कीं अजून एकदां देखील वाचला नाहीं म्हणून. नापास झालांत तर मामंजी काय म्हणतील माहित आहे ना? ''

'' काय म्हणणार आहेत, 'घराबाहेर हो' ना? हा मी आतां चाललों. पण आतां मला स्वस्थ बसवत नाहीं. आज दोनचार महिने भोंवतीं पेटलेली आग मी उघड्या डोळ्यांनीं पाहतों आहें. असलीं पुस्तकं मी रात्रीचा दिवस करून वाचतों आहें. पण कांहीं केल्या मनाची तळमळ थांबली नाहीं—कीं ती थांबविण्याचा निश्चित मार्ग सांपडत नाहीं. पण ती तळमळ आज तुझ्या त्यागानें थांबली. बस्स, ठरला माझा ठाम विचार. तूंच मला मार्ग दाखविलास. वहिनी, आजच्या हिंदुस्थानला डी व्हॅलेरा पाहिजे आहे, रूसो-व्हाल्टेअर पाहिजेत, मॅक्झिम गॉर्की पाहिजे आहे. मॅझिनी पाहिजे आहे. आणि खरंच वहिनी, '' शेल्फावरील ठोकळ्यांकडे बोट दाखवीत मी म्हणालों, '' ह्या शेक्सपियरची, शेले—किटस्—बायरन वगैरेंची बिलकुल गरज नाहीं आज आम्हांला. '' बोलण्याच्या आवेशांत टेबलावरचीं शेक्सपियरचीं दोन नाटकें ताडकन कोपऱ्यांत फेंकून दिलीं मीं.

वहिनी माझ्याकडे स्तंभित होऊन पहात होती. तिच्या चेहऱ्यावर समाधानाचें हास्य पसरलें होतें. तिला कसला तरी गूढ आनंद होत होता. '' वेडे

कुठले, निजा बघूं आतां." असें म्हणून ती आपल्या खोलींत निघून गेली. त्या रात्रीं मला रूसो, गॉर्की वगैरेंचींच स्वप्नें पडत होतीं.

* * *

नानांच्या संतापाला नी आईच्या त्राग्याला बिलकुल भीक न घालतां मीं कॉलेज सोडून दिलें आणि गांधींच्या सेवादलांत नांव नोंदवलें. मग घरीं राहणें अशक्यच होतें. माझ्या एका मित्राच्या खोलीवर सोय पाहावी लागली मला. वहिनी याच सुमाराला एकाएकीं कराचीला दादाकडे निघून गेली. एकाएकीं जाण्याचें कारण कळलेंच नाहीं मला, किंवा तिनेंहि कांहींच सांगितलें नाहीं. पुढें लवकरच रत्नागिरीला मिठाच्या कायदेभंगावर नेमणूक झाली आमची. त्या वेळीं आमच्या तुकडीनें दाखवलेलें धाष्टर्य, नंतर पोलिसांनीं केलेली आमची छळणूक व त्या वेळीं आमच्या तुकडीनें दाखवलेला बाणेदारपणा साऱ्या महाराष्ट्राला माहित आहे. पुढें आम्हां नऊ जणांना अटक होऊन आमच्या घोर अपराधासाठीं (!) त्या वेळच्या दयाळू (!) न्यायधीशांनीं आम्हांला तब्बल साडेतीन वर्षांची सक्त मजूरी ठोठावली. तारुण्याच्या उन्मादांत आम्हांला त्याचें कांहीच वाटलें नाहीं. माझ्या डोळ्यांपुढें तर माझ्या त्यागी वहिनीची सात्त्विक मूर्ति सारखी तरळत होती. विसापूर, धारवाड, नाशिक वगैरे जेल पाहून अखेरीला येरवड्याला आलों. तारुण्याच्या हिरीरीबरोबरच उद्धटपणाहि अंगांत खेळत असल्यानें शिक्षेंत कांहीं कमी होण्याचें बिलकुल चिन्ह नव्हतें, त्यांत शिवाय मागचे रिपोर्ट ! मग काय विचारतां ? अगदीं पुरेपूर चार वर्षें जेलची हवा खाऊन मी बाहेर पडलों.

**१९३६ च्या ऑगस्टची सत्तावीस तारीख. सुटकेचा सुवर्ण दिवस.**

दादा, वहिनी येतील अशी माझी कल्पना होती. पण ती कल्पनाच ठरली. तुरुंगांतून उघड्या वातावरणांत आल्यावर मला कळलें कीं १९३२ च्या पुण्यांत नी १९३६ च्या पुण्यांत जमीनअस्मानचें अंतर पडलें आहे. केशरी झाड्यांचा तो उत्साह, खादीवेषाचें तें चैतन्य, मला कुठेंच दृष्टीस पडलें नाहीं. भोंवतालच्या जगाप्रमाणें माझ्या घरच्या जगांत देखील तसाच फरक पडला होता. मला शिक्षा झालेली कळतांच आईनें हाय खाल्ली, त्यांतच तिचा अंत झाला. नानांची माझ्यामुळें नोकरी गेल्यानें आणि त्यांतच आईच्या मृत्यूची भर पडल्यानें त्यांना भ्रम झाला होता. त्यांतल्या त्यांत समाधान एवढेंच कीं,

मुन्सफीच्या जागेवर पुण्याला नेमणूक झाल्यानें कराची; सोडून, राहत्या घरीं दादाला यायला मिळालें होतें. हा सगळा इतिहास मित्राकडून मला कळला. आधींच तुरुंगांतल्या शारीरिक श्रमांनी माझें अर्धे तारुण्य खर्ची केलें होतें, त्यांत ह्या मानासिक आघातांची भर पडली. तरी माझें अंतःकरण एका आशेच्या किरणाकडे ओढ घेत होतें. विसाव्याचें स्थान म्हणून मी माझ्या वहिनीकडे गेलों.

*　　*　　*

दुपारचे तीन वाजले असतील त्या वेळीं. बाहेर पाऊस पडूं लागला होता, तरी देखील मी निघालों. मी घराच्या दिशेनें झपाझप पावलें टाकीत होतों. कल्पनातंद्रींतच मी दिवाणखाण्यांत पाऊल टाकलें. मला पाहतांच कपाळावर आठ्या चढवीत दादा ओरडला:

" ओ ! हां ! कोण ? देशभक्त कां ? या ! अग ए, येनकेन प्रकारेण प्रसिद्धि मिळाविलेल्या या पुरुषाला 'ज्ञानप्रकाशां'तला भिकार फोटो दाखव ग त्याचा." असें म्हणून दादानें सात मजली हंसें केलें. दादाचा स्वभाव मला माहिती होता. मी त्याच्याकडे दुर्लक्ष करून वहिनीकडे पाहिले. माझ्याकडे न पाहतांच तिथल्या रिकाम्या कपबशा उचलून ती आंत चालती झाली. माझ्या पोटांत चर्रर झालें. मन घट्ट करून मी तिथें बसलों. पांच मिनिटें झालीं. दहा मिनिटें झालीं. दादा कांहींच बोलला नाही. इतक्यांत बाहेर कुणी आल्याचें सांगायला वहिनी आंत आली. तेव्हां दादा उठलाच लगेच. माझ्याकडे क्षणभर पाहून तो वहिनीला म्हणाला, "हा कां आला आहे मला ठाऊक आहे. मी पडलों सरकारी नोकर. यांचे देशभक्तीचे चोचले आम्हांला भोंवायचे एखाद्या वेळीं. त्या हिरव्या कोटांतल्या पाकिटांतली एक पन्नासाची नोट देऊन जायला सांग बरं याला," असं म्हणून तो एकदम निघून गेला. मला कांहीं सुचेना. तो गेला त्या दिशेकडे मी आ वांसून पाहत उभा होतों. इतक्यांत " हे घ्या " असें म्हणत वहिनीनें अगदीं निर्विकार मुद्रेनें माझ्या हातांत नोट ठेवली. मला संताप आला. मनाचा तोल सुटून मी भावनावश होऊन बोलूं लागलों.

" वहिनी, वहिनी, मी पैशासाठीं आलों नव्हतों. तुझ्या तोंडचे दोन प्रेमळ शब्द मला पाहिजे होते. तुझ्या सात्त्विक हास्याचा मी भुकेला होतों.

आज मजजवळ एक पै देखील नाहीं. तुरुंगांतून सुटलेला मी एक राजकैदी आहे. बेकार-निराधार आहे. या सर्व परिस्थितीची मला जाणीव आहे. तरी देखील ह्या पन्नास रुपड्यांची किंमत मी चिटोऱ्यासारखी समजतों." मीं त्या नोटेच्या चिंध्या करून वहिनीच्या अंगावर फेंकल्या. ती कांहींच बोलली नाहीं. मी पुढें बोलूं लागलों. " वहिनी, तुझ्या त्या वेळच्या एकदाणीच्या त्यागानें मला कार्यप्रवृत्त केलें, माझी राष्ट्रीय वृत्ति खडबडून जागी केली, म्हणून मीं 'त्यागदेवता' म्हणून प्रेमानें तुला नमस्कार केला. पण आजच्या ह्या तुझ्या पन्नास रुपड्यांच्या त्यागानें माझ्या हृदयांतल्या सगळ्या भावना-" माझ्यानें पुढें बोलवेना. "वहिनी" म्हणून गदगदल्या स्वरानें मीं हांक मारली. तिनें दादाचा फोटो पदरानें पुसून नीट ठेवतां ठेवतां—माझ्याकडे पाहिलें. तिच्या डोळ्यांला पाणी आल्याचा भास झाला मला. ती कांहींतरी बोलेल म्हणून मी तिथें उभा राहिलों. पण शून्य दृष्टीनें दादाच्या फोटोकडे पहात ती गप्प उभी होती. तिच्या नजरेवरून माझ्यांत नी वहिनीच्यांत कसली तरी भिंत उभी असावी असें मला वाटूं लागलें—कसली तें मला समजेना. पण अभेद्य—अभेद्य असावी ती, असें मात्र तिच्या मुद्रेवरून खात्रीपूर्वक वाटूं लागलें मला. जवळ उभी असून दूर दूर जात असलेल्या वहिनीकडे मला पाहवेना. " वहिनी, येतों," असें कसेंबसें पुटपुटून मी बाहेर पडलों. अंगणांत येतांच समोरून नाना येतांना मला दिसले. त्यांच्या त्या भ्रमिष्ट चाळ्याकडे पाहून आईच्या आठवणीनें मला वाईट वाटलें. त्यांची नजर चुकवून, त्यांना नमस्कार करून मी पुढें निघालों. समोरून कुणाबरोबर तरी बोलत, सिगारेट ओढीत, बेफिकिरीनें—नी कुत्सित नजरेनें माझ्याकडे पहात दादा येत होता.

* * *

आज मी माझ्या एका मित्राच्या खेडेगांवीं तिथल्या दहावीस शेंबड्या पोरांच्याकरतां शाळा घालून बसलों आहें. कसें तरी पोट भरतों आहें. कधींमधीं अर्धपोटींहि राहावें लागतें आहे. कधीं पुण्याला आलों कीं आजच्या-प्रमाणेंच सभांना जातों; पण तिथल्या स्वयंसेविकांकडे पाहिलें कीं, मला माझ्या वहिनीची आठवण होते. माझी वहिनी देखील एक वेळ अशीच स्वयंसेविका म्हणून हिंडत होती. भावनेच्या भरांत तीहि त्याग करून

गेली होती आणि त्याच त्यागानें माझ्या हृदयांत देशभक्तीची ज्योत प्रज्वलित केली होती. त्यागी वहिनीचा फोटो अजूनहि माझ्या बसण्याच्या खोलींत लटकतो आहे. सकाळीं उठल्याबरोबर मी तिला दररोज भक्तिभावानें नमस्कार करतों, पण **त्या पहिल्या वहिनीला–दुसऱ्या नव्हे !**

ग्रामसुधारणेच्या चळवळीकरतां माझे कितीक खादीधारी देशबंधू माझ्या मित्राच्या खेडेगांवीं येतात–तेव्हां पूर्व ओळखीच्या नात्यानें माझ्याकडेच उतरतात. आणि वहिनीच्या फोटोखालच्या–'**सारें जग झुंजलें तरी जें कार्य होत नाहीं, तें स्त्रीच्या एका लहानशा त्यागानें होतें**' या बायरनच्या ओळी वाचून तें माझ्याकडे पाहतात. मी त्यांना हंसत हंसत माझ्या त्यागी वहिनीची गोष्ट सांगतों. तेहि आपल्या बरोबरीनें काम करणाऱ्या स्वयंसेविकांच्या गोष्टी सांगूं लागतात. त्या वेळीं पहिल्या वहिनीच्या जागीं दुसरी वहिनी मला दिसूं लागते. आणि एकदम चिडक्या आवाजांत मी बोलून जातों. " हं पुरे करा त्यांच्या त्यागाच्या गप्पा; **स्त्रिया क्षणभराच्या त्यागी असल्या तरी जन्माच्या भोगी असतात** समजलांत." माझ्या पहिल्या नि नंतरच्या बोलण्यांतली विसंगती पाहून त्यांना आश्चर्य वाटतें, आणि मग मात्र मी इतका बेचैन होतों कीं, त्यांच्या पुढच्या चर्पटपंजरीकडे माझें बिलकुल लक्ष लागत नाहीं. त्यांची माझ्याकडे पाठ वळतांच मी एकदम कोनाड्यांतून लो. टिळकांचें गीता-रहस्य घेतों नी त्यांत ठेवलेला पातळसा कागद काढून वाचूं लागतों—

११-१२-१९३७

**प्रभाकर भाऊजी—**

**तुरुंगांतून तुम्ही सुटून आल्यावर मी तुमच्याशीं तुसडेपणानें वागलें याबद्दल तुम्ही माझ्यावर खूप रागावलां असाल नाहीं ? पण भाऊजी, त्याचें खरें कारण जर तुम्हांला कळलं तर क्षमा कराल ना मला ? गुलामाला कधीं स्वतःचें मत असतें कां ? स्वतःहून कोणची एखादी गोष्ट करायची इच्छा असली तरी ती त्याला करतां येते कां ? आम्ही स्त्रिया ( प्रत्येकजणी जुलमाच्या जरी गुलाम नसलों तरी ) खुषीच्या कां**

होईना, गुलामच असतों ना ? जुलमाचें असो कीं खुषीचें असो, पारतंत्र्य तें पारतंत्र्यच ! बरं, स्वातंत्र्याची नुसती इच्छा असून काय होणार ? त्याप्रमाणें वागण्याची कुवत आमच्यांत कुठंय ? आम्हीं अबला आहोंत-निदान माझ्यांत तरी पतिप्रेमाचें छत्र झुगारून लोकप्रवादाला टक्कर देण्याचें सामर्थ्य नव्हतें; म्हणून नाइलाजानें—मोठ्या कष्टानें, भावनांचा कोंडमारा करून, देशसेवेचें कार्य टाकून, घरांत कोंडून घ्यावें लागलें मला.

चांगलें कुणाला पाहवत नाहीं हेंच खरं. मी तुमच्या घरांत आल्यापासून आपण दोघं अगदीं बहिणभावाच्या आपुलकीनं वागत आलों, एकमतानं, एकविचारानं चालत आलों. त्याचा अर्थ—कावळ्याच्या दोषैक दृष्टीनें स्त्री-पुरुषसंबंधाकडे पाहणाऱ्या—जगानें लावायचा तसाच लावला. या अभावित हल्ल्याची मला दादहि नव्हती. माझ्या एकदाणीच्या त्यागाचें पर्यवसान तुमच्या कॉलेज सोडण्यांत झालें. त्यामुळें तुमच्यापेक्षां माझ्यावरच सासूबाईंचा राग होता. त्यांच्याकडूनच [ तुम्ही घरांतून गेल्याच्या दुसरेच दिवशीं ] माझ्याबर तसल्या घाणेरड्या गोष्टींचा आरोप करण्यांत आला. भाऊजी, सांगा अशा वेळीं माझ्यासारख्या निर्बल स्त्रीनें काय करायला पाहिजे होतं ?

त्यांतच, इकडचं पत्र आलं कराचीहून. त्यांतहि हाच संशय उपरोधानं कां होईना, पण ओझरता बोलून दाखविलेला ! भाऊजी, मी तर अगदीं गांगरून गेलें. घरचेच वासे फिरूं लागल्यावर, आधारासाठीं मी कुठें पाहूं बरं ?

ह्या सगळ्या वादळाला शांतविण्याकरतां मी मामंजींना सांगून एकाएकीं कराचीला निघून आलें.

या सर्व प्रकारामुळें तुम्हीं तुरुंगांतून आल्यावर मी एक शब्दहि बोललें नाहीं तुमच्याबरोबर. भाऊजी, माझा एकदाणीचा त्याग **भावनेच्या भरांत** झाला होता, हें मी कबूल करतें. त्या दिवशीं रात्रीं बोलघेवडेपणाचा आरोप मीं तुमच्यावर केला होता, पण अखेर मीच बोलघेवडी ठरलें. पतिभक्ति कां देशभक्ति अशा तऱ्हेचा झगडा माझ्या बाबतींत निर्माण झाला होता. पण मीं त्याच्याविषयीं कधींच विचार असा केला नाहीं. सवडच मला मिळाली नाहीं म्हणा, कीं विचार करण्याची पात्रताच माझ्यांत

नव्हती म्हणा. पण महात्माजींच्या भाषणानें हृदय उचंबळून भावनेच्या आवेगांत मीं जशी एकदाणी देऊन टाकली, त्याचप्रमाणें माझ्या विरुद्ध—माझ्या चारित्र्याविरुद्ध उठलेलं वादळ पाहून घाबरून जाऊन मी कराचीला निघून गेलें, तुमचं नांवहि न काढण्याची शपथ घेऊन चुकलें.

मी दुबळी आहें, भावनावश आहें. किती तरी स्त्रिया अशाच असतील. तुम्ही पराक्रम करायचे, आम्ही ऐकायचे नुसते—त्याचे गोडवे गायचीहि आम्हाला चोरी आहे. स्वातंत्र्याचे पवाडे, स्वातंत्र्यासाठीं झगडणाऱ्या वीरांचीं चरित्रें आम्ही गुलामांनी गायचीं नाहींत. आणि गाऊन उपयोग तरी काय?

माझ्या भावनेच्या भरांतील त्यागानें माझ्या भाऊजींना राष्ट्रकार्याला प्रवृत्त केलें, यांतच मला समाधान आहे.

तुमची
**संसारी वहिनी—सुधा.**

---

## ३ जुनीं पत्रें

**श्री. ग. प्र. प्रधान**

चिमुकल्या बालकालाच काय पण "पिकल्या पानाला"हि नावीन्याची आवड असते. मग उत्साही युवकाला (आणि युवतीला) जुनें कसें आवडणार? प्रत्येक जण नव्या नवलाईचा भोक्ता! कांहीं गोष्टी मात्र जितक्या जास्त जुन्या तितकी त्यांची माधुरी अधिक! जुना मोरवळा आणि जुनें मद्य यांची गोडी अवीट नसते का? जुन्या पत्रांचें माधुर्यहि असेंच असतें.

रिकामपणाच्या वेळीं जुनीं पत्रें चाळण्यांत खरोखरच गंमत असते. आयुष्याच्या खडतर प्रवासांत गतायुष्यांतील सुखद स्मृतींमुळें मनाला उल्हसितपणा येतो. अमावास्येलाहि शशाङ्क पौर्णिमेच्या आठवणींनेंच स्वतःचें समाधान करून घेतो. जुनीं पत्रें वाचतांना आपलें मन गतकालांत अनिरुद्ध संचार करूं लागतें, आणि गतस्मृति आपल्या मनश्चक्षूंसमोर चलच्चित्रपटाप्रमाणें दिसूं लागतात.

एक दिवस माझ्या हाताला सहज एक जुनी चिठ्ठी लागली. वेड्या-वांकड्या अक्षरांत लिहिलेली ती चिठ्ठी मीं जपून कां ठेवली याचें कुतूहल वाटून मीं ती वाचली. मराठी शाळेंत असतांना माझ्या एका शाळुसोबत्याला मीं कांहींतरी चिडविलें होतें. त्याबद्दल त्यानें त्या चिठ्ठींत पांच गोळ्या खंडणी-दाखल मागितल्या होत्या. किती गंमत वाटली मला ती चिठ्ठी वाचून ! ती आमची खेड्यांतील देवळांत भरणारी शाळा, आमचे झोंपाळू मास्तर, ते वर्गांत झोंपले असतां त्यांची कातरलेली शेंडी, त्याबद्दल खाल्लेल्या छड्या या आणि अशा किती तरी गोड आठवणींत मी गुंग होऊन गेलों.

मी इंग्लिश चवथींत असतांना पुण्यास राहावयास आलों. शहराबद्दलचें कुतूहल आणि आईवडिलांपासून दूर होण्याची भीतिप्रद कल्पना यांनीं माझ्या मनाची स्थिति विलक्षण होऊन गेली. तेथें आल्यावर मला आईचीं आणि वडिलांचीं पत्रें येत असत. अगदीं साधीं असत तीं पत्रें. " प्रकृतीस जप. अभ्यास नीट करीत जा. " इत्यादि साधाच मजकूर त्यांत असे. पण भावनेनें, कळकळीनें किती ओथंबलेलीं असत तीं ! त्यांतील एक पत्र तर मीं आपल्या निजण्याच्या उशींत ठेवलें आहे. त्या उशीवर डोकें ठेवल्यावर आईच्या मांडीवर डोकें टेकून अंगाई ऐकत असल्यासारखें मला वाटतें, आणि मी निष्पाप बालकाप्रमाणें स्वस्थ निजतों.

एकदां मुंबईला जातांना मला माझा वसंत म्हणून एक मित्र भेटला. कॉलेजांत असतांना त्याचें आमच्या वर्गातील एका मुलीवर प्रेम बसलें होतें ( म्हणजे बसल्यासारखें त्याला वाटत होतें ). त्या वेळीं त्यानें तिला एक प्रणयपत्रिका लिहिली. पण पाठविण्याचा धीर न झाल्यामुळें ती त्याच्याजवळ तशीच राहिली. परीक्षा झाल्यावर खोली सोडण्याच्या गडबडींत ती माझ्या पुस्तकांतून माझ्या गांवीं आली ती, तशीच अजून मजजवळ आहे. परवां नाताळांत तो माझ्याकडे आला तेव्हां त्याला पाहिल्याबरोबर मला त्या प्रणयपत्रिकेची आठवण होऊन मीं त्याची खूप थट्टा केली. त्या वेळीं, चांदण्यांत कॅनॉलच्या कांठीं बसून मारलेल्या गप्पा, प्राध्यापकांच्या चेष्टा, फळ्यावर लिहिलेलें वाङ्मय (?) इत्यादि कॉलेजच्या वातावरणांतील रम्य आठवणी काढतां काढतां आमची सुट्टी कशी गेली तें आम्हांला समजलें सुद्धां नाहीं.

एका सुट्टींत मी आमच्या गांवांतील चारपांच हरिजनांच्या मुलांना शिकवीत असें. त्या वेळीं ग्रामकंटकांनीं दिलेला त्रास, घरांतून होणारे अडथळे आणि क्वचित् प्रसंगीं शिकणाऱ्यांचीहि अनास्था यांमुळें माझ्या मनाला अत्यंत उद्वेग वाटे. पण नंतर कांहीं दिवसांनीं जेव्हां माझ्या एका विद्यार्थ्याचें मला पत्र आलें तेव्हां मात्र मला किती आनंद वाटला म्हणून सांगूं! अद्यापि तें पत्र मी मोठ्या अभिमानानें वाचतों.

मनुष्य भूतकालाकडे नेहमीं निराशेनें पाहत असतो. पण आयुष्यांतहि सुखकारक प्रसंग येऊन गेलेले असतातच. लपंडावाच्या खेळांत आपल्यावर राज्य आलें असतां डोळे किलकिले करून पाहण्यांत किती मजा असते नाहीं! त्याचप्रमाणें खडकाळ जीवनप्रवाहांत असतांना असे मधुर क्षण आठवणेंहि सुखकारक असतें. मग अशा मधुर स्मृति जागृत करणारीं जुनीं पत्रें किती मधुर असतील !

---

## ४



खिडकीजवळ टपकन् आवाज झाला.

परंतु कागदावर वांकलेलें माधवरावांचें डोकें कांहीं वर उचललें नाहीं.

पलीकडल्या खोलींत आरसापेटी समोर घेऊन वेणी घालीत बसलेल्या रमाबाईनीं वर पाहून सूचना दिली.

" पत्र आलंय् कुणाचं–पाहायचं जरा ! "

माधवरावांनीं नुसतं " हूं " म्हटलं, अन् पुन्हां त्यांचा टांक कागदावरून दुप्पट वेगानें दौड करूं लागला.

शेवटीं रमाबाईनींच उठून तें पत्र उचललें.

डौलदार हिरव्या लिफाफ्यावर फुलांच्या अक्षरांनीं 'वसंत' हें नांव छापलें असून, 'मराठींतील कोणत्याहि चार मासिकांपेक्षां अधिक खप असलेलें' अशी संशयास्पद अनाहूत माहिती दडपून दिली होती.

" 'वसंत' मासिकाच्या संपादकांचं पत्र दिसतंय्..."

हे रमाबाईंचे शब्द ऐकतांच मात्र माधवरावांनीं खुर्चीवरून ताडकन् उडी मारली.

"मग आधीं सांगायला दांतखीळ बसली होती कां? आण तें पत्र इकडे." म्हणून माधवरावांनीं तें पत्र रमाबाईच्या हातून हिसकावूनच घेतलें. तें वाचीत असतां त्यांचे डोळे आनंदानें लकलकूं लागले. पत्रांतील पुढील मजकुराचीं तर त्यांनीं तीनतीनदां पारायणें केलीं. तो मजकूर असाः—

"...सोबतच्या पत्रकावरून आपल्याला कळून येईल कीं, आमच्या लोकप्रिय 'वसंत' मासिकांत पुढील महिन्यापासून आम्ही अंतर्बाह्य सर्व प्रकारच्या सुधारणा करणार आहोंत. मोठमोठे लेखक, टीकाकार, कलावंत, चित्रकार, गवैये, बजवैये, गायिका, नर्तिका, तारका या साऱ्यांनीं आम्हांला पूर्णपणें साह्य करण्याचें कबूल केलें आहे. आपणांस हें पत्र लिहिण्याचें कारण कीं, या कार्यांत आम्हांला आपलें साह्य मिळाल्यास आमचें मासिक साऱ्या हिंदुस्थानांतच नव्हे तर परदेशांतहि सर्वश्रेष्ठ करून दाखविण्याची आमची उमेद आहे. आमचे वर्गणीदार हिंदुस्थानांतच नव्हेत तर चीन, जपान, इराण, तुर्कस्थान, युरोप, अमेरिका, आफ्रिका, आस्ट्रेलियांतहि पसरले आहेत हें आपणाला माहीत असेलच. मासिकाचा इतका व्याप वाढल्यानें आम्हांला एक उपसंपादक नेमणें आहे. आपल्याला म्हणून खाजगी रीतीनें लिहायला हरकत नाही कीं, दोन प्रोफेसर, तीन वकील, आणि चार शिक्षक यांची या कार्यासाठीं मागणीहि आली आहे. परंतु त्यांचा विचार करण्या पूर्वी आपल्यासारख्या ध्येयवादी, उत्साही लेखकाला प्रथम संधि देण्याचें आम्हीं ठरविलें आहे. सध्यां आम्ही आपणांस चाळीस रुपये महिना वेतन देऊं. सध्यां आपणांस शंभर रुपये पगार आहे हें आम्हांस माहीत आहे. तथापि आमच्या मासिकाचे उपसंपादक होण्यांत किती फायदे आहेत इकडेहि आपण लक्ष द्यावें. या कार्यानें आपण वाङ्मयाच्या आकाशांत एकदम धूमकेतूसारखे प्रसिद्ध होऊन, कौतुकाचा आणि कीर्तीचा विषय व्हाल हें आम्ही सांगावयाला पाहिजे असें नाहीं. चार दिवसांत आपलें अनुकूल उत्तर येईल अशी आशा आहे. न आल्यास मात्र ही सुवर्णसंधि नाइलाजानें दुसऱ्यास द्यावी लागेल. इ. इ.

आपला + + +"

माधवराव या नव्या सृष्टीच्या कल्पनेंत गुंग झाले. सर्वांच्या तोंडीं झालेले बडे लेखक, वजनदार संपादक, कदाचित् भविष्यकाळीं साहित्य परिषदेचे अध्यक्ष......

पदवी नसूनहि, प्रोफेसर-वकिलांपेक्षां आपल्याला अधिक मानानें आमंत्रण आलें याबद्दल त्यांना धन्यता वाटत होती. इतक्या वर्षांत त्यांच्या स्वप्नसृष्टींतली ही पहिली कल्पना आज सत्यसृष्टींत उतरत होती. नाहींतर आयुष्याच्या उंबरठ्याशीं असतांना त्यांच्या कितीतरी कल्पना होत्या. पण वडील वारल्यामुळें उच्च शिक्षण सोडून मुंबईला एका व्यापारी फर्ममध्यें त्यांना नोकरी धरावी लागली, आणि आज दहा वर्षांनीं चढत चढत ते आज हेडक्लार्क झाले होते. जगाच्या राहटीप्रमाणें आईच्या पसंतीनें त्यांचें लग्नहि झालें. दहाजणींसारखी काळीसांवळी, मराठी चार इयत्ता शिकलेली एक साधीभोळी मुलगी त्यांना पत्नी म्हणून मिळाली. पण या साऱ्या संसाराच्या पिंजऱ्यांत माधवरावांच्या ध्येयवादी जीवाचा पक्षी असंतोषानें सारखा फडफडत होता.

त्यांनीं दारांतून आंत पाहिलें.

रमाबाई नुकत्याच अंग धुवून ठळक कुंकवाची चिरी कोरून लावीत होत्या. त्यांचा पदर खांद्यावर पडला होता. एरवीं नेहमीं वस्त्रांनीं झांकल्यामुळें आलेल्या दंडाच्या आणि खांद्याच्या उजळपणामुळें त्यांच्या हाताचा आणि तोंडाचा सांवळेपणा अधिकच उठून दिसून येत होता. कुंकू लावून, देवासाठीं फुलाच्या पुड्यांत आलेली उरलींसुरलीं दोन कुंदाचीं टपोरीं पण विनवासाचीं फुलें त्यांनीं आपल्या अंबाड्यांत खोंविलीं. तीं फुलें म्हणजे आपल्या आयुष्याचें प्रतीकच आहे असें माधवरावांना वाटूं लागलें. त्यांच्या जीवनांत कुन्दाचा साधेपणा होता: गुलाबाचा उन्मादकपणा नव्हता; कीर्तीचा मादक सुगंध नव्हता. त्यांच्या हृदयाला सौंदर्याची भूक लागली होती आणि मनाला नांवलौकिकाची. तिकडे पाहून माधवरावांनीं एक उसासा टाकला आणि पुन्हां कागदावर डोकें वांकविलें.

दुपारभर कचेरींत टाइपरायटरांची टक्टक्, टेलिफोनांचा कर्कश गजर, मॅनेजरच्या अर्ध्या कांचेरी दारामागून वेळोवेळीं येणारा कर्कश घंटेचा आवाज, —एक्सपोर्ट-इम्पोर्टच्या गिऱ्हाइकांचीं खातीं,—कार्ड इन्डेक्स, मालाच्या रसिदी, हुंड्या, बाजारभाव, या साऱ्या कामांचा निकाल ते यंत्रासारखे करीत होते.

त्यांच्या टेबलावरील तारेच्या ट्रेमधील सार्‍या प्रकरणांचे कागद, निरनिराळ्या खात्यांतील दैनिक रिपोर्टांचे तक्ते, यांचा चार वाजतां निकाल लावून त्यांनीं एका टाइपरायटरवर स्वत:च चार ओळी टाईप केल्या. आणि मॅनेजिंग पार्टनरच्या खोलीचें दार उघडून ते आंत शिरले. रसिकलालनें वर पाहिलें,

"कसा काय माधुराव ? या, बसा खुर्चीवर. तब्बेत तो ठीक हाय के नाय ? डोळा जरा चढल्यासारखे वाटते, ते वरून ..."

माधवरावांनीं मुकाट्यानें एक कागद त्यांच्या पुढें ठेवला. त्यावरून डोळे फिरवितांच रसिकलाल आश्चर्यानें उठून उभाच राहिला.

"अरेरे, ये काय लिवला हाय ? राजीनामा देते ? काय भेजा खसला के काय ? धा वर्सा झाला नोकरी करून कदी असा वागला नाही तुमी. जावा, जावा, गुस्से होउं नका खाली." म्हणून रसिकलालनीं चोळा-मोळा करून तो कागद खालीं टाकून दिला.

माधवराव म्हणाले, "आपल्या विश्वासाबद्दल आभारी आहें, साहेब. पण रागावून मीं राजीनामा दिला नाहीं. सारा जन्म ऑफिसांतली खर्डेघाशी करण्यांत घालविण्याची माझी इच्छा नाहीं. साहित्यसेवा करायची तर साहित्याच्या वातावरणांतच राहिलें पाहिजे. पैशाचा लोभ सोडला पाहिजे. 'वसंत' मासिकाच्या उपसंपादकाची जागा मला मिळाली आहे. त्या नोकरींतले चाळीस रुपये इकडील शंभर रुपयांपेक्षां मला जास्त आहेत. माझा लेखनव्यवसाय ......."

रसिकलाल चिडून उद्गारला, "लिवते-बस्स-लिवते. तुम्ही बद्धा लोक पागल झाला कीं काय ? जो उठला तो लिवते. दुसरा धंदा नाय. ये बघा, माधवराव, आम्ही तुमची नाउमेद नाय करते—पण एटलूं ध्यानांत असूंदे के लिवायचा शोख म्हणून ठीक. पण तेचेवर पोट भरूं बगेल तर फार भूल भूल होएल तुमची. तुमचे देशमंदी समदा फोकट वाचते—चोपडी वेचाती बी लेते नाय. आमचे गुजरातमंदी आमी दुसर्‍याचे चोपडी भीक माणून वाचतें नाय म्हणून आमचा मुनशी, रमणलाल समदा लेखक सेंकडो रुपया कमाते ..."

"—पण कांहीं असो, साहेब, मीं एकदां निश्चय केला तो केला. रजा घेतों आपली." म्हणून ते उठले.

रसिकलालनेंहि उठून त्यांच्याशीं हस्तांदोलन केलें: “हे बघा, माधवराव, इतका वरस झाला, नोकर नाहीं, आमचा दोस्त समजून आम्ही वागते तुमच्या बरोबर. आमच्या गुजराती फर्ममदीची तुमच्यासारखा दक्षणी हेडक्लार्क ठेवला आमीं. आमच्या जातवाला गुस्से झाला तोबी. अने आता तुम्ही एकदम असा जाते; लयी वाईट वाटते आम्हाला—ठीक; तुमची मर्जी—कागदपत्र-लिवा—भुलून जाऊं नका, तुमचे चोपडी आणि वार्तामंदी.”

बाहेर येऊन माधवरावांनीं ‘वसंत’ मासिकाच्या मालक संपादकाला संमतीचें पत्र लिहून टाकलें. अंधार पडेपर्यंत चौपाटीच्या वाळूंत बसून मनांतल्याप्रमाणें वाळूचेहि उंच उंच किल्ले त्यांनीं बांधले.

दररोज साडे नऊ वाजतां पाटावर बसून मुकाट्यानें ताट पुढें ओढणारे माधवराव दुसऱ्या दिवशीं अकरा वाजूनहि स्वयंपाकघराकडे फिरकले नाहींत, हें पाहून रमाबाई मनांत चरकल्या. त्यांनीं किलकिल्या दारांतून पाहिलें आणि “पान वाढलंय्” म्हणून हळूच सूचना दिली. शेवटीं माधवरावांनीं एका दमांत सारें सांगून टाकलें—“ हें पहा, आजपासून मुंबईतली नोकरी मीं सोडली आहे. परवां पुण्याला जायचं आहे आपल्याला. त्याची तयारी करा. अन् सांगून ठेवतों, पहिल्या-पहिल्यानं पैशाची जरा ओढाताण होईल. शंभराऐवजीं चाळीस रुपयेच येणार आहेत आतां घरांत. तेव्हां हात आंखडता घ्या जरा ..... हं पुरे. उपदेश करायला नको आहे तुम्हीं. पटेल तर राह्यचं आहे. नाहींतर माहेरीं वाट पाहत असतील तुमचीं मायेचीं माणसं.” म्हणून आंचवून ते तडक बाहेरच्या खोलींत निघून गेले.

वाङ्मयांतील सरस्वतीची उपासना करतांना घरांतल्या लक्ष्मीशी दोन प्रेमाचे गोड शब्द बोलण्याचीहि माधवरावांना फुरसत नव्हती. त्यांत पुन्हां साहित्यांतल्या स्त्रीसौंदर्याच्या कल्पनांनीं दिपलेल्या त्यांच्या डोळ्यांना रमाबाईंची नीटस पण काळीसांवळी मूर्ति नकोशी वाटे. गॅलरींत उभे राहून रस्त्यावरील जाणाऱ्या-येणाऱ्या रूपवती स्त्रियांकडे पाहून ते वेडे उसासे टाकीत. “ आपली पत्नी अशीच असती तर ! ” हा विचार त्यांच्या मनांत येई. कधीं कधीं तर “ सुदैवानें ही पत्नी मेली तर ! ” असा अभद्र विचारहि त्यांच्या मनांत चमकून जाई. तशी संधि आलीच तर आपल्या सौंदर्यकल्पनेप्रमाणें कोणती पत्नी योग्य होईल या विचारानें प्रौढ मुलींकडे ते

आशाळभूतपणानें पाहत. त्यांच्या दडपलेल्या सौंदर्यभावनांचा हा रिकाम-पणचा खेळच होता.

माधवराव रागावून उठून गेल्यानंतर डबडबलेल्या डोळयांनीं रमाबाई त्याच पानावर बसल्या. ताटांतलें खरकटें बाजूला निपटून, त्यांनीं उरलेलें अन्न वाढून घेतलें. पतीच्या कठोर बोलांनीं गळा दाटून येऊन पहिलाच घांस त्यांच्या घशांत अडकला. त्यांचा हुंदका बाहेरच्या खोलींत ऐकूनहि माधव-रावांनीं लघुकथातंत्रावरील एका नव्या इंग्रजी पुस्तकांतून डोकें वर केलें नाहीं.

दोन दिवसांनंतर माधवराव सहकुटुंब पुण्यास आले.

'वसंत' मासिकाच्या कचेरीबद्दल माधवरावांच्या कल्पना फार निराळ्या होत्या. संपादकांनीं दिलेल्या पत्याप्रमाणें मार्ग काढायला त्यांना फार वेळ लागला. त्यांत पुण्याच्या पेठा त्या! एखाद्या घराचा नंबर दोनशें असला तर त्याच्या शेजारच्या घराचा नंबर एकदम चारशेंवर उडी घ्यायचा आणि दोनशें एक नंबर पाहण्यासाठीं चार बोळ तुडविण्याची वेळ यावयाची! असे पेठ बोळांचे चक्रव्यूह भेदून माधवराव दिलेल्या घरनंबराशेजारीं आले तों त्यांचा विश्वासच बसेना डोळयांवर. एका मोडकळीस आलेल्या, तिमजली चौसोपी पेशवाई वाड्यावर "**वसंत मासिक आणि छापखाना**" या नांवाची रंग उडालेली एक लहानशी पाटी लोंबत होती.

ते माडीवरील संपादकीय कचेरींत गेले तेव्हां एक मळकट कपडे घातलेला, दाढी वाढलेला, जाड आरशीवाला गृहस्थ समोरच्या टेबलावर दोन्ही पाय पसरून, खुर्चीवर जवळजवळ उताणा पडून आढयाशीं खेळणाऱ्या आपल्या विडीच्या धुराकडे पाहत होता. माधवराव दाराशीं खांकरले.

त्याबरोबर दचकून पाय मागें ओढून घेऊन त्या इसमानें खुर्चीवर बैठक मारली.

माधवरावांनीं आंत जाऊन संपादकांचें आलेलें पत्र टेबलावर ठेवलें. त्या-बरोबर त्या इसमाचा चेहरा खुलला, आणि मग त्याचा बोलण्याचा जो कांहीं लोंढा सुरू झाला कीं त्यांत गटंगळ्या खातांखातां माधवरावांची अगदीं दमछाकी झाली.

"ओहो हो! माधवराव कोटिबुद्धे तुम्हीच कां? वा! अलभ्य लाभ, अलभ्य लाभ! तुमचें पत्र मिळाल्यापासून वाटच पाहत होतों तुमची. धन्य

आहे. वाङ्मयसेवेसाठीं बऱ्या नोकरीवर लाथ मारणारे ध्येयवादी साहित्यिक म्हणून पुढील अंकांत तुमचा तिरंगी फोटो छापणार आहें मी."

त्यांनीं टेबलावरील घंटेवर हात मारला, पण तिची स्प्रिंग तुटल्यानें ती मुकीच राहिली. तेव्हां ते स्वतःच ओरडले—" अरे गणू, समोरून दोन कप चहा पाठवायला सांग पाहूं. अगदीं फर्मास आला पाहिजे बरं कां. खालीं प्रेसमध्यें सांग आपले नवे उपसंपादक आले आहेत. सारं त्यांनाच विचारायचं यापुढें......चला माधवराव, तुमचें ऑफिस दाखवितों तुम्हांला. आजपासून तुम्ही नोकरीवर रुजू झालांत, तेव्हां आतां धंद्यांतल्या खुब्या तुम्हांला दाखवून द्यायला हव्यातच."

" हं ! हें तुमचं ऑफिस. या १९०० सालापासूनच्या इंग्रजी, अमेरिकन, हिंदी, गुजराथी मासिकांच्या फायली. तुमचं मुख्य काम म्हणजे यांच्या चालू अंकांवर लक्ष ठेवून जरूर लागेल तेव्हां मागच्या अंकांचाहि उपयोग करायचा. अहो लिखाणाला काय तोटा ? उगीच नाहीं—एक नव्हे पांच मासिकें चालताहेत आमच्या छापखान्यांत. आपलं ' वसंत ' मुख्य—नंतर बायकांसाठीं ' वनिता ', सिनेमा-शौकिनासाठीं ' तारका ', आपलं एक औद्योगिक असावं म्हणून ' उपद्याप ', आणि मुलांसाठीं ' पोरखेळ '— आणि तींहि साधी नव्हेत—सचित्र ! दुरंगी, तिरंगी -हाफटोन—लाइन—लिनो—वुडकट ब्लॉकसह !'

बिचाऱ्या माधवरावांनीं एकदोनदां बोलण्याचा यत्न केला; पण नुसत्या एका हाताच्या ऐसपैस हवेंतल्या फटकाऱ्याबरोबर मालकांनीं त्यांचे अडथळे नाहींसे करून टाकले.

" हें पहा, पुनः पुनः सांगत बसणं नाही आवडत मला. एकदां तुम्हांला ' इन्स्ट्रक्शन्स् ' दिल्या कीं माझं काम संपलं. मग तुमच्या कर्तबगारीवर बाकी उरणार आहे...हां, काय म्हणत होतों मी ? यस्—आतां मुख्य गोष्ट म्हणजे तुम्ही जीभ अगदीं मिठास ठेवली पाहिजे या धंद्यांत. या खोलींत दररोज लेखक-लेखिकांचा थवा जमत असतो. त्यांतल्या त्यांत पाहून, त्यांना चहाचा कप देऊन त्यांत स्तुतीची भरपूर साखर पेरायची. जो लेखक येईल तो त्याच्या क्षेत्रांत सर्वश्रेष्ठ बरं का. अन् त्यांत त्याच्या एखाद्या प्रतिस्पर्ध्याची थोडी निंदा करतां आली तर फारच झकास. आणि आपलं हें पहा ( त्यांनीं

एक डोळा जरा मिटला.) साहित्यिकांपेक्षां ' साहित्यिकीं 'कडे जास्त लक्ष ठेवा. त्यांचा लेख दोन ओळींचा असला तरी वर तिरंगी फोटो घालायचा— तोहि आहे तसा नव्हे ' रि-टच् ' करून, मग ती व्यक्ति ओळखूं न आली तरी चालेल. कोणी मोबदल्याबद्दल प्रश्न काढलाच तर त्याला खालीं पाठवा माझ्याकडे. तें काम तुम्हांला नाहीं जुळणार. श्रीमंत लेखकांचे लेख जाहिरातींच्या दरानें छापण्याची व्यवस्था फक्त आमच्याच मासिकांत आहे— तेवढं लिहिण्यासहि त्यांना वेळ नसला तर तुम्हीच लिहून त्यांच्या नांवावर छापायचे. त्यांच्या स्पेशल आकाराचें कोष्टक आहे माझ्याकडे तें घेऊन चला......"ऐकतां ऐकतां माधवरावांच्या चेहऱ्यावर घामाचे थेंब डबडबूं लागले. भोंवतालची खोली गरगरा फिरते आहे असें वाटूं लागलें... तिकडे पाहून मालकांनीं पुनः सरबत्ती सुरू केली.

"...दचकूं नका, घाबरूं नका असे. अहो, वाङ्मय झालं म्हणून काय? कोणतीहि कला आली कीं तिचं ' टेक्निक् ' आलंच—आमच्या धंद्याचं तंत्रच आहे हें. म्हणून कांहीं तरी जीव धरून आहोंत आम्ही; नाहीं तर आजची मराठी वाङ्मयाची आर्थिक स्थिति माहित आहेच तुम्हांला. बरंय्, पुढच्या अंकासाठीं लेखांच्या या फायली पहा. आतां मला प्रेसकडे बघायचंय्. संध्याकाळीं या घरीं. इकडच्या ठळकठळक साहित्यिकांचा, साहित्यिकींचा परिचय करून देईन सहज फिरतां फिरतां..."

कडवट चहाचा कप घेतल्यानंतर माधवराव कुरकुरत्या खुर्चीवर बसून देवदारी लांकडाच्या टेबलावरील फायलींकडे गोंधळून पाहतच बसले. शेवटीं त्यांनीं दौतींत टांक बुडविला आणि आपल्या कार्याला सुरुवात केली.

दिवसांमागून दिवस जात होते.

दुरून साजऱ्यागोजऱ्या दिसणाऱ्या वाङ्मयव्यवसायाच्या पोटीं काय काय प्रकार भरले आहेत याची खरी कल्पना माधवरावांना हळूहळू होऊं लागली.

त्यांचे फायदे मात्र दोन झाले.

' वसंत ' मासिकांत त्यांची चालू कादंबरी सुरू झाली हा पहिला आणि कुमारी बुद्धिमती धैर्यधर या लेखिकेचा दाट परिचय झाला हा दुसरा.

लेखणीपेक्षां डोळ्यांची तिरंदाजी करण्यांतच या लेखिकेचें कौशल्य अधिक

दिसून येई. माधवरावांसारख्या साध्याभोळ्या सावजाची तर तिनें पहिल्या बाणांतच शिकार केली.

बारीक मुंग्यांच्या रांगेसारख्या दिसणाऱ्या कोरलेल्या भुंवया, पोष्टाच्या पेटीप्रमाणें लालभडक रंगलेले ओंठ, आणि गोल गुंडाळलेलें बीतबीत उशाचें भडक रंगीत पातळ असें तिचें ध्यान होतें. ओळख होऊन दोन दिवस झाले नाहींत तोंच तिसऱ्या दिवशीं मुरडत हंसत येऊन तिनें माधवरावांच्या खुर्चीच्या हातावर बैठक मारली.

"— अश्शी फाइन आयूडिया सुचली आहे–कुण्णीं कुण्णीं लिहिलं नाहीं तिच्यावर. गोष्टीला सुरुवातसुद्धां केली हो. पण मेली अर्ध्यावरच अडली. अस्सा राग आला मेलीचा—मग म्हटलं आपल्या माधवरावांखेरीज दुसऱ्या कुणाला सांगायचंच नाहीं—पण इथं नको–संध्याकाळीं घरींच येतें अन् मग तेव्हांच लिहून टाकूं कीं नाहीं ?...हंसायचं नाहीं. नाहीं तर मी रागावेन हं अगदीं सीरिअसली- आतां कांहीं ऐकायची नाहीं मी !– !—कामं काय सदाचींच आहेत तुमचीं."

—म्हणून गाल फुगवून चारदां मानेची वांकडी कसरत करून वेड्या-वांकड्या लिखाणाचे दोन कागदाचे तुकडे तिनें माधवरावांपुढें टाकले—

संध्याकाळपर्यंत माधवरावांनीं नीट प्लॉट जुळवून ठेवला. रात्रीपर्यंत त्यांच्या घरच्या खोलींत बसून बुद्धिमतीबाईनीं माधवराव सांगत असलेली गोष्ट लिहून घेतली. एका टेबलाशीं—माधवरावांच्या खुर्चीला खुर्ची भिडवून बसलेल्या बुद्धिमतीबाईच्या केशसंभाराचा मादक सुगंध माधवरावांना बेचैन करीत होता—कागदावरून धांवणाऱ्या त्या गोल, गौर वलयांकित मनगटांवर त्यांची दृष्टि खिळली होती.

बिचाऱ्या रमाबाई बंद दारामागें उभ्या होत्या आणि—बुद्धिमतीबाईच्या नाजूक गळीं हंसण्याचे, 'अय्या—इश्श—जा मेलं—कांहीं तरीच तुमचं' अशा शब्दांचे आवाज ऐकत होत्या.

...आणि हळूहळू बुद्धिमतीबाईचें नांव एक प्रतिभाशाली लेखिका म्हणून प्रसिद्ध होऊं लागलें.

या साऱ्या उन्मादक वातावरणांत व्यावहारिक गोष्टींकडे माधवरावांचें दुर्लक्षच होत होतें.

पहिल्या महिन्याचा पगार आपल्याकडे येईल म्हणून त्यांनीं १० तारखे-पर्यंत वाट पाहिली—आणि मग हळूंच संपादक-मालकांकडे गोष्ट काढली.

"— अं ? म्हणतां तरी काय ? पगार मिळाला नाहीं तुमचा ? अशक्य गोष्ट—अशक्य गोष्ट ! अहो महिन्याच्या शेवटच्या तारखेला आम्ही चेक्नें रक्कम काढतों आणि पांच तारखेच्या आंत सारा पगार अन् बिलें खलास—मग महिनाभर एक पैहि खर्ची पडायची नाहीं—हो शिस्तच आहे आमची ——असेल—असेल—कॅशिअरची चूकीही असेल पण तुमचं तरी काम होतं की नाहीं बोलायचं ? आतां कसं करायचं...दिला असताहो—आतां दिला असता पगार; पऽऽण ?—संस्थेचा सक्त नियम आहे म्हणतों ना—पांच तारखेनंतर एक पैहि खर्ची घालायची नाही—मऽग ? काय करायचं आतां ? हो ! असंच करा कीं—पुढल्या महिन्याला दोन्ही महिन्यांचा पगार एकदमच घेऊन जा म्हणजे झालं..."

मालकांच्या शब्दांच्या लोंढ्यांतून कसेबसे पैलतिरीं येऊन माधवरावांनीं मुकाट्यानें पोस्टल सेव्हिंग बँकेंतून पन्नास रुपये काढून बिलें भागविलीं.

दुसऱ्या महिन्याला प्रेसमधील कागदांचा वर्षाचा सांठा करून ठेवण्याच्या निमित्तानें माधवरावांना पगार मिळाला नाहींच. मुंबईच्या खार्चिक राहणींतून शिल्लक राहिलेली रक्कम पुण्याचा नवा संसार मांडण्यांत खर्च झाली——पुन्हां पन्नासाची रक्कम उचलल्यावर खात्यावरील बाकी शून्य राहिली.

हळूहळू छापखान्यांतील 'वनिता' आणि 'तारका' मासिकांच्या संपा-दनाचें कामंहि माधवरावांच्या अंगावरच पडूं लागलें. 'वनिता' मासिकाच्या संपादिकेनें बाळंतपणासाठीं चार महिन्यांची रजा घेतली होती, आणि 'तारका' मासिकाचा संपादक आपली पट-कथा घेऊन मुंबईच्या फिल्म कंपन्यांत खेटे घालीत होता. अनेकदां हें काम सोडून देण्याचे विचार माधव-रावांच्या मनांत येत. पण वेळोवेळीं खूपशी स्तुति करून, कथासंग्रह, कादंबरी, निबंधसंग्रह या साऱ्या लिखाणाचें प्रकाशन करण्याची लालूच दाखवून, पुढें भरपूर वेतन देऊन वचपा काढण्याचें वचन देऊन मालकांनीं माधवरावांना थोपटून धरलें होतें.

बदललेलें हवापाणी—तळमजल्यावरील दमट जागा, आणि अंधाऱ्या

खोलींत विजेच्या दिव्याखालीं नऊ तास काम—मोकळी हवा नाहीं—व्यायाम नाहीं—विश्रांति नाहीं—मनःस्वास्थ्य नाहीं!

साहित्याच्या चक्कीला जुंपलेल्या माधवरावांची अशी दमछाकी चालली होती. चहा-विडी-सिगारेटच्या कृत्रिम उत्साहावर ते कामें करीत. दिव्यांतलें तेल संपल्यावर ज्योत कायम ठेवण्यासाठीं आपण ती कोरडी वातच वरवर सारावी, ती थोडा वेळ जळत राहून शेवटीं पटकन् मालवली जावी असा माधवरावांच्या प्रकृतीचा खेळ चालला होता.

एके दिवशीं सकाळीं मात्र माधवरावांना अंथरुणावरून उठवेनाच.

त्यांनीं छापखान्यांत काकुळतीनें निरोप पाठविला आणि ' औषधपाण्यासाठीं निदान दहावीस रुपये तरी ताबडतोब पाठवून द्यावे' म्हणून निकडीची विनंति केली. त्यावर मालकांचें मासलेवाईक उत्तर आलें तें असें—

—" आपण तापानें आजारी आहांत हें वाचून फार फार वाईट वाटलें. सुदैव हेंच कीं, 'वसंत' मासिकाच्या मागील अंकांत आपण तापावर एक महत्त्वाचा लेख लिहिला होता, त्याप्रमाणें वागून आपण लवकरच रोगमुक्त व्हाल अशी आशा आहे. बहुतेक रोग अपचनामुळेंच होतात. तरी आपण आठ दिवस कडकडीत लंघन करावें—डॉक्टर-वैद्यांच्या खिशांत उगीच पैसा घालूं नये. आठ दिवस पाण्यावर राहून काय अनुभव येतो तो कळवावा—पुढील अंकांत आपल्या फोटोसह तो प्रसिद्ध करूं. अर्थात् यामुळें औषधोपचारासाठीं आपण मागितलेल्या रकमेची जरूरच पडणार नाहीं. म्हणून ती पाठविली नाहीं. अंथरुणावर पडल्या पडल्या रोग्याचा वेळ जाणें कठीण असतें म्हणून 'वसंत'; 'वनिता' आणि 'तारका' मासिकांच्या पुढील अंकांच्या दीडशें पृष्ठांचीं पहिलीं ' गॅली प्रुफें ' पाठविलीं आहेत, आणि आपली बिनपगारी रजाहि मंजूर केली आहे—तरी त्याची काळजी करूं नये. आमच्या नोकरवर्गाकडे आम्ही नेहमींच सहानुभूतीनें पाहत असतों. आपण खुशाल चारआठ दिवस विश्रांति घेऊन दुप्पट जोमानें साहित्यसेवेला लागाल अशी आशा आहे.

आपला— × × ×"

शेवटीं रमाबाईंनीं आपले बिलवर गहाण टाकून कांहीं रक्कम उभी केली आणि माधवरावांच्या औषधपाण्याची सोय केली.

रात्रीं दोनचा सुमार होता.

माधवरावांना औषधाचा डोस् देऊन त्यांच्या उशाशीं बसल्याबसल्याच गुढग्यापर्यंत मान लववून रमाबाई पेंगत होत्या—त्या एकाएकीं दचकून जाग्या झाल्या.

माधवरावांचे डोळे लालभडक अन् सताड उघडे होते.

—कधींकाळीं मनांत ठसलेलें एक जुनें पद ते वेडेवांकडे सूर काढून बरळत म्हणूं लागले होते.

—" हें फळ काय मम तपा ऽ ऽ ला ? "

मध्येंच ते भेसूरपणें हंसून बरळूं लागले.

—" साहित्यसेवा...वाङ्मय-यज्ञ...हाहाहा...गळे कापा आणखी... उपाशीं मारा आणखी ..झब्बूगिरी..फुकटेबाजी...भरल्या पोटाचे उद्योग."

" असं काय हें ? " रमाबाई घाबरून म्हणाल्या.

" स्वस्थ पडावं जरा—बडबडूं नाहीं असं, शपथ आहे माझी. " त्यांनीं माधवरावांच्या डोक्यावर कोलन वॉटरची घडी ठेवली.—

—" पाणी !— " पांच मिनिटांनंतर शुद्धीवर येऊन माधवराव बोलूं लागले.

—" बुद्धिमतीबाई आल्या होत्या काल ? कळविलं कां त्यांना मी आजारी आहें तें ? " त्यांनीं क्षीण आवाजानें विचारलें.

—" नव्हत्या आल्या त्या—पण त्यांनीं गड्याबरोबर चिट्ठी पाठविली कीं आपल्याला जरा बरं वाटल्याबरोबर त्यांनीं पाव लिहून ठेविलेली गोष्ट आपण सबंध लिहून काढून परत धाडावी लवकर—कुठल्याशा चढाओढीसाठीं पाठवावयाची आहे त्यांना. "

—" पैशाचं काय झालं ?—निदान उसनवार म्हणून तरी ? "

—" सध्यां सवड नाहीं म्हणून कळवलं त्यांनीं. "

—" मग ?...हा खर्च कुठला ? "

रमाबाईनीं पदरामागें हात लपविला.

—" केली कशी तरी व्यवस्था—देव पाठीराखा आहे आपला...आतां स्वस्थ पडायचं जरा—कपाळ चेपूं कां ? "

माधवरावांचें अंग निखाऱ्यासारखें धगधगत होतें—त्यांच्या डोळ्यांतून वाफा निघत होत्या.

——" कांहीं नको—नुसता हात ठेव बरं कपाळावर. किती गार—किती बरं वाटतं... "

माधवरावांनीं आपला हात त्या हातावर ठेवला...मनगटावर आलेली कांचेची एकच बांगडी बोटाला लागून त्यांनीं दचकून सताड डोळे उघडले.

——" काय केलंस हें ? बांगड्या विकल्यास माझ्यासाठीं ? " त्यांच्या डोळ्यांच्या कोपऱ्यांतून आसवांचे ओघळ वाहूं लागले. एक आवंढा गिळून ते कष्टानें म्हणाले,

" रमा ! कशाला कष्ट करतेस इतके माझ्यासाठीं ? इतकं तिरस्कारानं वागविलं मीं तुला, लिहिण्याच्या व्यसनापायीं तुला सुखाचा क्षण दाखविला नाहीं—रूपाबद्दल तुला हिणवलं. तुझ्या मरणाची सुद्धां इच्छा केली—अन् अशा नादानासाठीं तुझीं सौभाग्यलेणीं मोडलींस तूं—रमा, कुठें फेडूं माझीं पापं ! "

——"पुरे—पुरे, किती त्रास करून घ्यायचा जीवाला ? हें औषध घ्यायचं अन् अगदीं मुकाट्यानं झोंपीं जायचं—उद्यां खात्रीनं बरं वाटेल .."

——लहान मुलाप्रमाणें अगदीं आज्ञाधारकपणें माधवरावांनीं औषधाचा कप तोंडाला लावला.

घामानें भिजलेली त्यांच्या डोक्याखालची उशी रमाबाईनीं उलटून सरकवून ठेवली—चादरीचे सळ मोडून सारखे केले, आणि अंगावर नीट ब्लँकेट ओढून घेतलें. माधवरावांनीं त्यांचा कपाळावरचा हात घट्ट धरून ठेवला.

——तुफान समुद्रांत गटंगळ्या खाणाऱ्या खलाशानें एखादी लांकडी फळी जीवाच्या आधारासाठीं घट्ट धरून ठेवावी—तशा निर्वाणीच्या आशेनें त्यांनीं तो हात घट्ट धरून ठेवला होता. पहांटे पूर्वेला तांबडें फुटलें तरी झोंपेंतहि माधवरावांच्या हातांत तो हात तसाच होता—त्यांची झोंपमोड होऊं नये म्हणून अगदीं अवघडून रात्रभर रमाबाई तशाच बसून राहिल्या होत्या.

डॉक्टरांच्या औषधानें असो, किंवा रमाबाईच्या प्रेमळ शुश्रूषेमुळें असो माधवराव पंधरा दिवसांनीं हिंडूं फिरूं लागले. मात्र 'यापुढें प्रकृति नीट ठेवावयाची असल्यास राहती जागा आणि हवा यांत बदल झाला पाहिजे' असें डॉक्टरांनीं निक्षून सांगितलें.

या पंधरा दिवसांत माधवरावांच्या देहाप्रमाणें मनांतहि बराच फरक झाला होता–पण 'पुढें काय ?' हा प्रश्न दत्त म्हणून पुढें उभा होताच. जरा बरें वाटल्यावर माधवराव ' वसंत ' कचेरींत कामावर रुजू झाले—परंतु पगारासाठीं आणखी महिनाभर थांबण्याची सूचना करून, त्यांच्या गैरहजेरीमुळें मासिकांचें किती नुकसान झालें याचें भडक वर्णन करण्यांतच मालकांनीं अर्धा तास वक्तृत्व गाजविलें.

सात्त्विक प्रकृतीच्या माधवरावांचेंहि डोकें या प्रकारामुळें भडकलें. त्या तिरीमिरींत राजीनामा खरडून ते घरीं येऊन बसले.

त्यांना दशदिशा शून्य झाल्या. ते कपाळाला हात देऊन बसले असतां मागून हळूंच आवाज आलाः

— " माझं ऐकणं होईल कां ? –असेल तर सांगतें... "

" हं बोल ! खुशाल बोल–माझ्या अकलेचे हे धिंडवडे निघाले. तेव्हां तुझ्यापुढें मला बोलायला तोंड कुठें आहे ? काय म्हणतेस ? माहेरीं नेतेस मला ? तेवढं तरी समाधान लाभूं दे मामांना..."

–" मी म्हणतें आपण एक पत्र टाकावं मुंबईला, आपल्या जुन्या कचेरींत. मालकांची फार मर्जी होती आपल्यावर अन् निरोप देतांना फार वाईट वाटलं त्यांना–इकडूनच सांगायचं झालं होतं."

–" अग ! कसलं काय, नी कसलं काय ! आपली बोलायची रीत आहे झालं. बाकी गोड बोलून हाताखालच्या माणसांना खूष ठेवून काम कसं करून घ्यावं ही कला गुजराथी मालकांना माहित आहे खास. नाहींतर आपल्याकडे ! जरा सत्ता हातीं आली म्हणजे हाताखालच्या नोकरांना घालून पाडून बोलण्यांत, परक्यापुढें त्यांचा पाणउतारा करण्यांतच मालकांना भूषण वाटायचं–मग बिचाऱ्या नोकराचा जीव सदांचा विटलेला. ठराविक कामापलीकडे कशाला तो जीव पाखडणार ? मागं अंग मोडून काम केलं मीं पण रसिकलालच्या गौरवानें मूठभर मांस चढल्यासारखं वाटे मला–पण आतां काय त्याचं ? त्याचा उपदेश लाथाडून मी अभिमानानें निघून आलों इथें, आणि आतां त्याच्या पुढंच तोंड वेंगाडायला सांगतेस मला ? "

–"पण मी म्हणतें एकदां आपला रस्ता चुकला हें कळल्यावर त्याच रस्त्यानें पुढें जाण्यांत काय फायदा बरं-त्यांतून काय ? फार तर 'नाहीं' म्हणेल एवढंच

ना ? इकडून म्हणायचं होतं तशीच मी आपली अशिक्षित भोळीभाबडी आहे. पण माझा विश्वास आहे कीं, साऱ्यांनीं आपल्याला सोडलं तरी देव नाहीं आपली उपेक्षा करणार. मला दुसरं कांहीं कळत नाहीं—हे पाय मला परत मिळाले—पूर्वीची आढी दूर होऊन आपण मायेनं बोलायला लागलांत —यानंच धन्य झालें मी. आतां देवाजवळ दुसरं कांहीं मागणं नाहीं— अशीच भरल्या कपाळीं, सोनं होऊन जावं, अन् शेवटीं आपलेच हात अंगाला लागावेत एवढंच मागणं आहे...."

रमाबाईचा गळा दाटून आला. माधवराव खिडकीकडे पाठमोरे वळले. त्या दिवशीं नाखुषीनेंच त्यांनीं मुंबईला एक पत्र टाकलें. रस्त्यानें जातांना सहज एक धोंडा चिंचेच्या झाडावर मारावा आणि पुढें जावें अशाच रीतीनें त्यांनीं तें पत्र टाकलें होतें.

चार दिवस झाले असतील त्याला. माधवराव सकाळीं लिहीत बसले होते.

खिडकीजवळ टप्कन् आवाज आला.

" पत्र आलंय कुणाचं—पहायचं जरा. "

रमाबाईनीं आंतून सूचना दिली.

पण माधवरावांनीं डोकें कागदावरून उचललें नाहीं.

रमाबाईनींच तें पत्र उचलून पुढें ठेवलें.

पत्रावरील 'रसिकलाल डाह्याभाई' अक्षरें वाचून मात्र माधवराव उत्सुकतेनें उठून उभे राहिले. धडधडत्या काळजीनें त्यांनीं तें पत्र फोडलें. एक जाड कागदाची घडी त्यांतून खालीं पडली. पत्र चार ओळीचेंच होतें.

फर्ममधील त्यांची हेडक्लार्कची जागा भरली असली तरी त्यांचे जुने संबंध जाणून त्याखालची जागा त्यांना देण्याची तयारी त्यांत दर्शविली होती. रुजू झाल्यापासून चालू पगारापैकीं शंभर रुपये त्यांच्या नांवें लिहिले असून चेकची पावती पाठविण्याचें लिहिलें होतें.

वाङ्मयीन अघळपघळ वक्तृत्वापेक्षां या व्यवहारी परंतु माणुसकीच्या साध्या चार ओळी माधवरावांना फार श्रेयस्कर वाटल्या.

त्याच दिवशीं माधवरावांनीं रमाबाईच्या बांगड्या सोडवून आणल्या. बिलें चुकतीं करून तिसऱ्याच दिवशीं ते मुंबईला निघाले. ' वसंत ' मासिकाच्या कचेरीजवळून टांगा जात असतां माधवरावांची नजर आंत गेली.

मालकासमोरच्या खुर्चीवर एक चष्मेवाला तरुण बसला असून दोघांपुढें चहाचे कप होते. शेजारच्या खुर्चीवर सुप्रसिद्ध लेखिका बुद्धिमतीबाई धैर्यघर बसल्या असून त्या हंसहंसून किटलींतून चहाचे पेले भरीत होत्या. .....
......पूना एक्सप्रेस खंडाळ्याच्या घाटांतून बांकड्या वळणानें धांवत होती. एरवीं काळेकभिन्न दिसणारे डोंगर पावसाळ्यामुळें हिरवेगार झाले होते. रेल्वे लाइनजवळच्या काळ्या खडकांवरहि बारीक शेवाळाची हिरवी मखमल अंथरली होती. माधवराव मात्र या सुंदर देखाव्याकडे पाहतांनाहि बेचैन होत. अगदीं शून्य नजरेनें ते कुठें तरी लांबवर पहात होते. त्यांची तंद्री लागलेली पाहून रमाबाईंनीं हळूच समोरच्या बांकावरून प्रश्न केला,

"इतकं काय निरखून पहायचं तें ?"

"—कांहीं नाहीं—दूरचे डोंगर" माधवराव उत्तरले.

आणि एक उसासा टाकून त्यांनीं आपल्या बाजूची खिडकी बंद करून घेतली.

---

## ५ घोटाळा

श्री. मुरलीधर गजानन पानसे

कल्पनेचा चेहरा उतरलाच जरा बाबांची नाखुशी पाहून. खालच्या मानेनें पदराचें टोंक बोटाला गुंडाळीत ती जाऊं लागली. बाबांना काय वाटलं कुणास ठाऊक, त्यांनीं तिला परत बोलावलं.

"किती पैसे लागतील तुला, कल्पना ?"

"पंधरा रुपये पुरतील, बाबा."

"अग एवढेसे कसे पुरतील ? रेल्वे, गाडीभाडं—"

"मी आपली नवी गाडी घेऊन जाणार होतें."

"तुला ती दगदग नाहीं झेपायची, कल्पा."

"पण बाबा, मामांना तरी कशीहो पाह्यला मिळणार गाडी आपली ?"

"अस्सं, गाडीनं मामांचे डोळे दिपवायचे आहेत एकूण ! अं ! बरं-बरं चालेल. जा तूं."

एकाच जागीं राहणं कधीं कुणाला आवडलंय कां! झाडाखालीं पिकलेलीं पानं गळून पडून झालेला पाचोळासुद्धां थोड्याशा वाऱ्यानं थारे पालट करण्याची संधि फुकट दवडत नाहीं. मग कल्पना तर काय ? आजच्या कॉलेजसारख्या बागेंतल्या नाजूक लतेची नुकतीच फुटलेली पालवी होती. कॉलेजकरितां एकसारखं वर्षभर पुण्यांत राहावं लागलं होतं. आतां नुकतीच सुट्टी झाली होती. आणि तिला आपल्या मामांकडे जायची लहर आली. लगेच नाचत नाचत ती दिवाणखान्यांत गेली आपल्या बाबांकडे.

"मामांकडं जाऊं मी, बाबा ?"

"इतक्यांत ? अग पुरते ८ दिवस तरी झालेत का सुट्टी लागून ?"

"पण पधरा दिवसांच्यावर नाहीं राह्यची मी."

"तें सगळं खरं. पण आम्हांला कसं करमावं इथं ?"

"असं तर नेहमींच व्हायचं, बाबा. मग......"

"अग जाशील पुढं केव्हां तरी."

या नाखुशीमुळं तिचं तोंड जरासं आंबट झालं.

आपल्या श्रीमंतीचा थाट दाखविण्याकरितां मुलगी आजोळीं चाललेली पाहून त्यांचा विचार सरकन् फिरला आणि आगदीं कांकूं न करतां चटकन होकार देऊन ते मोकळे झाले. साहजिकच आहे. आपली श्रीमंती लोकांना दिसावी असं कुणाला नाहीं वाटत ? त्यांतून कल्पना ही बाबांची एकटीच मुलगी.

दुसरे दिवशीं दुपारीं चार-साडेचार वाजतां कल्पना आपल्या भावाबरोबर नवीन मोटारमधून नाशिकला जायला निघाली. पुणें सोडून ते पंचवीस तीस मैल गेले मात्र; काय झालं गाडीला कुणास ठाऊक, ती बंदच पडली. ड्रायव्हरनं उतरून पाह्यलं एंजिन उघडून. नंतर मोटारच्या खालीं पडून कांहीं तरी पाह्यलं. गाडी नीट व्हायला निदान दोन तास तरी लागतील असा त्यानें अंदाज सांगितला. इतकं काय झालं होतं नादुरुस्त हें ज्यांच्याजवळ मोटारी आहेत त्यांनासुद्धां ठाऊक नसतं तर आपल्याला तरी कसं कळणार ? आसपास सगळीं बाभळीचीं झाडं आणि जमिनीवर सगळीकडं कांटेकुटे. कल्पना चिडली खूप. पण करणार काय ताटकळत उभी राहण्याखेरीज ? दहापंधरा मिनिटें होती स्वस्थ उभी मोटारकडे पहात. हाताला कांहींतरी

चाळा म्हणून नकळतच तिनं आपली पर्स उघडली आणि त्यांतून एक हिरवटसर नोटपेपरची घडी बाहेर काढून ती उलगडली. शाळेंतल्या एका मैत्रिणीचं पत्र होतं तें. त्यांत तिनं कल्पनेला सुट्टींत एकदां तिच्या गांवीं येण्याचा आग्रह केला होता. तिची कळी खुलली. तिनं पत्र भावाला दाखवलं.

"दादा, आतां येईल त्या लॉरींतून मी जातें पुढें; अन् गाडी नीट झाल्यावर तूंहि ये मागून."

"कल्पा, गाडी नीट झाल्यावरच आपण दोघेहि जाऊं. माझाहि एक मित्र आहे तिथं."

"अरे, पण मला दोन तास ताटकळत बसायला नको म्हणून ना म्हणतें आहें मी हें."

"बरं तसंच करूं. मित्राकड राहीन मी रात्रीं अन् सकाळीं दहा-साडे-दहा वाजतां येईन तुझ्याकड नी मग निघूं पुढें."

कल्पनेनं आपल्या मैत्रिणीचा पत्ता लिहून दिला भावाला. पांचदहा मिनिटांतच एक लॉरी चालली होती तिला थांबवून कल्पनेला बसवून दिलं तिच्या भावानं. ती गांवीं पोहोंचली तेव्हां तिन्हीसांज टळून गेली होती. रस्त्यांत तिनं एका गवळणीला विचारला विमल लिमयेचा पत्ता. गवळणीनं दाखवलं तिला तें घर.

विमल लिमये कल्पनेच्या वर्गात होती एकदोन वर्षं शाळेंत असतांना. ती बोर्डिंगांत राहत असल्यामुळं तिच्या घरचीं माणसं ऐकूनच ठाऊक होतीं कल्पनेला. ती गेली त्या दिवशीं विमल वडिलांबरोबर शेजारच्या गांवीं गेली होती शेतावर. तिच्या आईनं विमलच्या खोलींत कल्पनेची स्वतंत्र रीतीनें व्यवस्था ठेवली होती. येण्याची तारीख नक्की न कळवल्यानं हा घोटाळा झाला. सगळं काम वगैरे आवरेपर्यंत विमाच्या आईशीं गप्पा मारीत बसली होती कल्पना. निजायला त्यांना ११ वाजून गेले रात्रीं.

कल्पनेला रात्रीं दोन अडीच वाजतां उठावं लागलं. विमाची आई दिवसभरच्या कामानं दमली असल्यामुळं तिला सोबतीला उठवावं हें कल्पनेला प्रशस्त वाटेना. म्हणून ती एकटीच बाहेर गेली. आणि आली तेव्हां तसंच पाठीमागें दार घट्ट लावून घेतलं. पण कॉटवर कुणीतरी दुसरंच निजलेलं पाहून ती बावरली. इकडेतिकडे जरा नीट न्याहाळून पाहिलं बाजूला. एका हँगर-

वर कोट अन पँट लटकावलेली होती. अन् एक टेबलावर लेखनसाहित्य आणि पांचसात पुस्तकं वगैरे संसार पाहून तिची खात्री होऊन चुकली कीं आपण खोली चुकलों. तशीच मागें वळून दार उघडूं लागली. पण दोन्ही फळ्या एकदम लावल्यामुळं दार घट्ट बसलं होतं. गडबडीनं दोन्ही फळ्या एकदम ओढून कसं उघडणार तें लवकर ? ती जास्तच गांगरली. आपण खोली चुकून परपुरुषाच्या खोलींत अशा अवेळीं आहोंत हें पाहून फारच शरमली ती. डोळ्यांपुढं अंधारी आली तिच्या. विमलच्या आईला कळलं हें तर काय म्हणतील त्या ? त्यांच्या तोंडून ही गोष्ट षट्कर्णी झाली तर अब्रूचे धिंडवडेच नाहींत कां ? या गांवचा आणि माझा संबंध काय वास्तविक ? आलें कशा-करितां अन् झालं काय ? नसतें आलें तरी बरं झालं असतं. दहाजणांचीं दहा तोंडं. हात कुणीं लावायचा त्यांना ? कांहींजण तर असंसुद्धां म्हणतील कीं मैत्रीण नाहीं असं पाहूनच आली. मग आतां ?

दार उघडण्याची खटपट चालूच होती तिची. भेदरल्यामुळें अंगांत शक्तीच नाहींशी वाटत होती. बंद दार लवकर उघडण्याचें चिन्ह दिसेना. इथं काय चेटूक आहे कीं काय ? मी आलें तेव्हां दार नुसतं लोटलेलं होतं. मी आलें तेव्हां मींसुद्धां नुसतंच लोटलं तें. मग इतकं घट्ट कसं बसलं ? भूतबाधा तर नाहीं इथं ? एकूण याच खोलींत मला ही रात्र काढावी लाग-णार कीं काय ? छेगऽऽ बाई ! अंगावर शहारेच येतात नुसत्या कल्पनेनं. परकं गांव, कधीं न पाह्यलेलं घर, ओळखदेख नसलेल्या पुरुषाची खोली. वेळ तरी पहा ! तीहि अशी अपरात्रींची. लोकांना तरी कां नाहीं येऊं संशय ? त्यांतून मी पुण्यासारख्या शहरांतली, कॉलेजांत जाणारी, श्रीमंताची मुलगी. श्रीमंताच्या मुली, त्यांतल्या त्यांत शिकलेल्या, चवचाल असतात अशी लोकांची ठाम समजूत. विमलच्या आईचं सुद्धां असंच मत आहे. काल जेवणाच्या वेळीं झालेल्या बोलण्यावरून स्पष्टच दिसलं तें. या गृहस्थाला उठवून त्याला सगळी हकीकत सांगून सुटावं का त्याच्या मदतीनं इथून ? पण तरुण माणसाचा अशा वेळीं काय भरंवसा ! तो सभ्य असला तर ठीक. नाहींतर ? मीच आपण होऊन या खोलींत आलेली, तो तरी काय म्हणेल ? मीं जरी खरी बाजू मांडली तरी कुणाला खरी वाटणार ती ? नकोच त्याला उठवणं ! हें काय ? ही तर बिमाची ट्रंक. तिचंच नांव आहे वर. पाहूं तरी काय

काय आहे त्यांत तें. काय करायचंय पाहून ? नसत्या उठाठेवी. माझी जिवाची मैत्रीण आहे ती. काय झालं पाह्यलं म्हणून !

कल्पनेनं ती ट्रंक उघडली आणि त्यांतले सगळे कपडे ती पाहूं लागली. उजव्या कोपऱ्याला खालीं तळाशीं एक नोटपेपर नीट घडी करून व्यवस्थित ठेवलेला दिसला. अत्तराचा वास आला. बाटली बाजूलाच पडली होती; पण तिला वाटलं नोटपेपरलाच लावलंय. घडी उलगडली तर अक्षर ओळखीचंच दिसलं. खालीं सही—नारायण दाते. तिची खात्रीच पटली कीं, आपल्यां कॉलेजमधला a Sport and a Scholar दाते तो हाच. त्याचा टेनिसचा खेळ कल्पनेला अति आवडे. त्यानं खेळलेल्या प्रत्येक मॅचला ती हजर होती. बोलतां बोलतां " If you don't mind अं " असं अगदीं आर्जवानं म्हणण्याची त्याची लकब कल्पनेनं न कळत उचलली होती.

त्याचं पत्र विमलला ? हिची कुठली ओळख ? हिची ओळख असल्या-बद्दल कधीं बोल्ली नाहीं ती माझ्याजवळ. इतर सगळ्या तिच्या मित्रांची लिस्ट आहे मजजवळ. याचा अन् विमलचा काय संबंध ! पत्र तरी काय आहे !

'प्रिय विमा,

तूं अगदीं माझी वाट पाहत असशील नाहीं ? अग अभ्यास नसला तरी खेळाचा मोहच सुटत नाहीं बघ. मी अगदीं ताबडतोब येतों असं तुला वचन दिलं खरं, पण सगळींच का वचनं पाळायचीं असतात !......'

तिच्या धक्यानं ट्रंकेचं दार धाडकन् आपटलं; त्या रात्रीच्या भयाण शांततेंत तो आवाज तोफेप्रमाणं वाटला. कल्पनेचं अंग थरारलं. तो उठतो कीं काय म्हणून तिनं मच्छरदाणीकडं पाह्यलं. पण नाहीं. तो कुम्भकर्णच दिसला अगदीं. ती पुढं वाचूं लागली.

' ......भिऊं नकोस कांहीं. मी आपलं मुख्य वचन नाहीं मोडत. आतां मात्र मी आजपासून चवथ्या दिवशीं तिथं येतों. या वेळीं अगदीं हिरमोड नाहीं करणार मी तुझा. आतां या थापांच्या चेंडूची फेंकाफेंक पुरे. This is the last shot. Game and set. अच्छा.'

नारायण दाते

मुख्य वचन मोडणार नाहीं आणि हिरमोड करणार नाहीं, म्हणजे प्रकरण फारच पुढं गेलेलं दिसतंय. विमा तर किती साधीसुधी अन् हें कसं ! पत्राची घडी करून होती तशी ठेवली. तिथंच नारायण दातेचा स्वाक्षरीचा कार्ड साईझ फोटो होता. तो नकळत तिनं आपल्या ओटींत ठेवला. तिच्या डोळयांपुढं विमल आणि नारायण दाते नाचूं लागले.

खोलींत एकदोन येरझारा घातल्यावर ती दारापाशीं गेली. एक फळी आंत दाबून दुसरी ओढली तों दार उघडलें. तिच्या जरा जीवांत जीव आला. दिवा बारीक करून ती तेथून निसटली. पण बाहेर पडते तोंच विमलची बहीण बाहेर चाललेली. आतां मात्र कल्पनेची पांचावर धारण बसली. ज्याला ती भीत होती तेंच नेमकं पुढयांत वाढून आलं. तिला घेरी आल्यासारखं वाटलं म्हणून तिनं भिंतीचा आधार घेतला.

विमाच्या बहिणीनं माझ्याकडं पाहालं नाहीं. तिनं मुद्दाम तर नसेल पाहण्याचं टाळलं ? सर्वांसमोर चहाच्या वेळीं तर ती मला कांहीं प्रश्न करणार नाहींना ? आहे आतां चांगलीच फजिती. सकाळीं दादा आल्यावर त्याला हें कळेल. मग काय म्हणेल तो मला ? काल आपण दोघंहि एकदमच जाऊं असं तो म्हणाला असतां मी अगोदर आलें. हें कळलं तर त्याला काय शंका येईल ? माझ्याकरितां तो वरवर विश्वास आहे असं दाखवील कदाचित्; पण त्याच्या मनाचं कोण धनी ?

आपल्या खोलींत जाऊन कॉटवर ती पडली खरी पण झोंप लागणं तरी कसं शक्य होतं तिला ? सहा सव्वासहाला प्रातर्विधि उरकण्याकरितां बाहेर पडावं म्हणून कोंपऱ्यांत चपलांकरितां ती गेली. पण चपला होत्या कुठं तिथं ? ती रात्रींच्या धांदरटपणांत चपला तिथं खोलींत विसरली होती. आतां चागलं उजाडलं होतं. विमाची आई बाहेर सडा घालीत होती. आतां जाऊन त्या चपला घ्यायच्या कशा ? घेतल्या तर विमाच्या बहिणीच्या सांगण्याला भक्कम पुरावा मिळायचा. अनवाणीच ती बाहेर पडली. आईच्या जवळून जातांना तिच्या उरांत केवढ्यांदा तरी धडधडत होतं. प्रातर्विधि उरकून चहासाठीं स्वयंपाकघरांत ती गेली ती जीव मुठींत धरूनच.

" ओहोहो, कल्पाताई, आपण कुणीकडं इकडं ? केव्हां आलांत ? आम्हांला कांहीं कळवलं नाहींत अगदीं ? "

प्रत्यक्ष नारायण दातेच समोर. कल्पनेच्या कपाळाला आठ्या पडल्या. ती कांहींच बोलली नाहीं.

" आपण यायचं रात्रीं बेरात्रीं गाण्याहून, मग कोण जागणार तुम्हांला सांगायला कीं विमाताईची मैत्रीण आली आहे म्हणून. "——मालू.

" म्हणजे तुमची अन् विमलची ओळख आहे वाटतं ? ती कशी झाली बुवा ? ती इथें, तुम्ही पुण्याला ? एकदांच आली होती पुण्याला, मला वाटतं, नाहीं ग, मालू ?"

कल्पनेला शंका आली कीं याला भ्रम झालाय कां आपल्याला ? नारायण दातेला मधून मधून थट्टा करण्याची लहर येत असे हें कल्पाला ठाऊक होतं.

" बरं, आतां मी स्नानाला जातें. मग बोलूं आपण. If you don't mind अं ! " तो आविर्भाव पाहून दोघंहि हंसलीं. कल्पना तेथून सटकली ती खोलींत. बॅगेतून आपलं पातळ, ब्लाउज वगैरे काढून घेते आहे तोंच नारायण तिच्या खोलींत हजर.

" या चपला तुमच्या आहेत वाटतं ? माझ्या खोलींत होत्या त्या. "

कल्पनेचं तोंड खाडकन् उतरलं. गुलाबी छटा जाऊन पायाच्या तळव्या-सारखं पांढरं पडलं तें.

" छे, छे, कल्पाताई तुम्हांला त्यांत कांहीं वाटायला नको. मालू किनई Somnamulist आहे. झोपेंत ती जामानिमा करून झक फिरायला निघते. म्हणून तर मोठ्या दरवाजाला कुलूप लागतं. "

कल्पनेचा जीव एकदम खालीं पडला-नाहीं, तरी तो खालीं खालीं येत होता.

" रात्रीं गाण्याहून यायला उशीर झाला. झोपेनं अगदीं वेडा झालों होतों. कसे तरी कपडे उतरवले आणि कॉटवर पडलों मात्र, कीं झोप लागली. कडी लावायची राहली तशीच. झालं, मालूचाच प्रताप दिसतोय हा. "

आतां मात्र कल्पनेचा जीव साफ खालीं पडला.

" बरं, मी जातों. I have detained you. Excuse me अं ! "

नारायण निघून गेला. कल्पनेनं स्नान वगैरे केलं. मालू रामाच्या देवळांत

फुलं आणायला गेली होती. देऊळ तिला माहीत नव्हतं तें कुठें आहे हें समजावून घेऊन ती तिकडे जायला निघाली. दोनचार घरं टाकलीं नाहींत तों दारांत कल्पनेची विमल लिमये.

" कोण, कल्पना ? "

" विमल ? "

दोघींनाहि आश्चर्य वाटलं.

" विमल, तूं इथं कशी ? "

" तूं कांहीं बोलूं नकोस. काय ग, इथं येऊन आमच्याकडं नाहीं उतरलीस ? वाऽ रे मैत्रीण. "

" म्हणजे ? तेंऽऽ घर ना तुझं ? मी काल संध्याकाळीं आलें तेव्हां तुझ्या आईनं सांगितलं कीं ती वडिलांबरोबर शेतावर गेली आहे म्हणून. "

विमलच्या डोक्यांत प्रकाश पडला. ती मोठ्यांदा हसूं लागली.

" अग बाई, ती विमल लिमये, माझी चुलत चुलत बहीण हो ? चांगल्या दोन चुली आहेत मधें. पत्र पाठवलं असतंस तर कशाला झाला असता घोटाळा ? चांगली झाली फजिती ! "

" फजिती ! " कल्पनेच्या डोळ्यांसमोर रात्रीचा प्रकार उभा राहिला. तिनं मान खालीं घातली.

" निदान परवां तो नारायण दाते आला तुझ्या कॉलेजांतला त्याच्याबरोबर निरोप तरी पाठवायचा ! "

" तुझी अन् त्याची ग काय ओळख ? "

" आहाऽ ग, त्या विमलचा मामे भाऊ कीं तो. "

" अस्संऽऽ होय ! " रात्रीचं पत्र—" मुख्य वचन मोडणार नाहीं ! " भावाचं बहिणीला असं कोणतं वचन असणार ? तिथंच ती ढेकळाप्रमाणं विरघळली.

आणखी एक दिवस कल्पना अन् तिचा दादा विमल लिमये नं. २ कडे राहिले आणि मग पुढें नाशिक—!

---

( लघुतम कथा )

६

# सौ. कुमारी

श्री. म. वि. घासकडबी

' तो ' कॉलेजच्या आवारांत कुठंहि भेटला अन् ' ती ' त्याच्याशीं कांहींतरी बोलली नाहीं असं कधींच व्हायचं नाहीं.

आमचा हा 'तो' म्हणजे सीनिअरच्या वर्गातला सुरेश भावे अन् ' ती ' म्हणजे त्याची ती ही F. Y. मधली मिस् सरोज चित्रे.

चहाच्या वेळीं बिस्किटांचं चर्वण करण्याऐवजीं आम्ही ह्याच विषयाचं चर्वितचर्वण चालवीत असूं. परवां तसंच झालं.

" कायरे ही पोज कुणाची रे ? " बाब्यानं खोलींतल्या एक फोटोकडे पहात सहज मला विचारलं.

" अं...ती होय? आपल्या त्या मिस सरोजची." मी उत्तरलों.

" हं, म्हणजे ती नटी होय. म्हटलं का आपली ती चित्रे. हो, नाहींतर तो एक भाव्या आहेच लेकाचा आणि तूं दुसरा--भावड्या म्हणजे झालंच. कुठें तो ' सुभाष ' अन् कुठं तूं ' सुभ्या. "

" तो गोरीला कुणीकडं अन् हा चँपेझी कुणीकडं ? " विशानं अक्कल पाजळली.

" अरे नाहीं ! विशा, परवां मीं प्रत्यक्ष पाहिलन् त्यांना 'बंड'वर. बरं, लग्न जमलंय म्हणावं, तर हा लेकाचा ब्राह्मण, ती C. K. P. याचा बाप डॉक्टर तर तिचा बाप वकील. हा राहतो कँपांत तर ती आहे जिमखान्यावर आणि—"

" तो पुरुष तर ही बायको असंच कीं नाहीं? " विशा पुन्हां चमकला.

" जाऊं द्यारे, आपल्याला काय करायच्यात नसत्या उठाठेवी." मी बैठक आटपीत म्हणालों. आणि रॅकेटस् घेऊन आम्ही बाहेर पडलों. ××× —आणि तसंच मागल्या शनिवारीं. तीं दोघें बरोबर जातांना आम्हांला वर्गाच्या खिडकींतून दिसलीं मात्र, आम्हीं एकमेकांला खुणवून रस्ता गांठला

बरं थोडक्यांत निभावलं. नाहींतर तास सुरू झाला असता म्हणजे बाहेर पहात कां होईना आंत बसावं हें लागलंच असतं.

चौघांनीं सायकली अशा मारल्यात म्हणतां ! शिकार साधारण टप्प्यांत येतांच बोलणं बंद करून नुसत्या डोळ्यांवर सगळं काम सोपवून आम्ही त्यांच्या मागोमाग जाऊं लागलों.

" चल, चहा घेऊं या जरा." पुढून आवाज आला.

" हो, हो, बाय ऑल मीन्स. " मंजुळ उत्तर आलें.

आम्हीं एकमेकांकडे पाहिलं मात्र; अन् सायकली बॉयजवळ देऊन त्यांच्या पाठोपाठ 'कॅफे'त शिरलों.

पण आमचं नशीबच फुटकं तिथं काय ! सगळ्या रूम्स Engaged. एकच काय ती रिकामी होती. पण त्यांतच आमच्या ' नायक-नायिका ' शिरतांना दिसल्यामुळें आम्हीं सगळे ' व्हिलन ' चरफडत एका टेबलाभोंवतीं बसलों. डोळे आणि कान मात्र त्या खोलींकडेच लागले होते.

" बोलो, साब. " मी एकदम दचकलों. वेटर विचारीत होता. जीव खालीं पडला आमचा. " चार चाय " मी झोंकून दिली ऑर्डर. चहा पिऊन झाला डझनभर केक्सचा फडशा पडला. पण ती खोली दार उघडील असं चिन्ह दिसेना.

अर्धा तास झाला, पाऊण तास झाला; पण छे—पत्ता नाहीं.

" अरे, पळाले वाटतं बेटे. " विन्यानं शंका काढली.

आणि, आणि तीच खरी ठरली. बॉयनें engaged चें vacant केलें. खेळ खलास करून आम्ही उठलों.

" मागच्या दारानं गुंगारा दिलान् वाटतं ×××× " विशा चरफडत पुटपुटला.

आम्ही बिल देऊन बाहेर आलों व सायकली घेऊन सरळ रस्ता सुधारला.

" बस्स, ठरलं. " विशा एकदम ओरडला. " पुन्हा यांच्या भानगडींत पडायचं नाहीं आपल्याला. महिन्यावर परीक्षा आली आणि तुम्ही अजून सीरिअस होत नाहीं म्हणजे ? " पश्चात्तापदग्ध विशा पुढाऱ्याच्या आवाजांत बोलत होता. तो आणखीहि बोलत राहिला असता. पण खोलीच समोर आल्यामुळें तो तसाच थांबला.

आणि त्याचं म्हणणं—चुकून कां होईना—अक्षरशः खरं ठरलं. परीक्षा संपेपर्यंत आम्हीं हा विषय काढलाच नाहीं कधीं. सुट्टी लागली त्या दिवशीं मात्र आम्ही एकमेकांचे निरोप घ्यायला जसें विसरलों नाहीं तसेंच नेहमीं-प्रमाणें त्या दोघांची थोडीशी टवाळी करायलाहि विसरलों नाहीं.

सुट्टी कशी संपली तें देखील कळलें नाहीं. कॉलेज सुरू होऊन आतां एक आठवडा लोटला होता. अभ्यास जोरांत नसल्यामुळें आम्ही कुठं तरी नोटिस-बोर्ड पाहत भटकत होतों—

" हें बघितलंस कां, बन्या !" एका नोटिसवर बोट ठेवीत विशा म्हणाला.

आणि ती नोटीस दुसरी कसली नसून यंदा फर्स्ट क्लासांत आलेल्या सुभाष भाव्यांच्या परदेशगमनाप्रीत्यर्थ होणाऱ्या सभेची होती.

सभा तीनला होती; पण अडीचपासूनच आम्ही चौघे अगदीं पुढल्या बांकावर दाटी करून बसलों होतों.

बरोबर तीनला सर्व सद्‌गृहस्थ आले. बरोबर कांहीं सद्‌गृहिणीहि होत्या. सर्व समारंभ झाला. इतक्यांत बन्या ओरडला,

" मिस् चित्रेना हार काय म्हणून ? " आणि खरोखरच तिला हार घालण्यांत आला होता. आम्ही एकमेकांकडे पाहूं लागलों.

डोक्याला बराचसा ताण देऊनहि उत्तर सांपडेना. आमच्यांत चुळबुळ सुरू झाली. शेवटीं अगदीं राहवेनाच. तेव्हां मीं शेजारच्या बांकावरील गृहस्थाला विचारलें—

" कां हो ? या मिस् चित्रेना हार कां घातला हो ? "

" म्हणजे ! मला नाहीं कळलं. अहो नवऱ्याच्या सन्मानप्रसंगीं बायको-चाहि नको का सन्मान करायला ! "

" अँ ऽऽऽ ! आणि लग्न कधीं झालं यांचं ! " मीं बुचकळ्यांत पडल्यामुळें पुन्हां प्रश्न केला.

" कमाल विनोद करतां बुवा ! अहो राव, तो ज्युनियरला असतांनाच त्यांचं लग्न—आणि तेंहि अगदीं वैदिक पद्धतीनं झालं. मिश्रविवाह केल्याबद्दल वर्तमानपत्रांतून त्यांचं अभिनंदनहि झालं होतं. आहांत कुठं ! " तो गृहस्थ उत्तरला.

" मग हिनं नांव कसं ' मिस् चित्रे लावलंय ! " मीं शंका काढली.

" अहो जें एकदां राहिलं शाळेंत तें बदललं नाहीं एवढंच. शिवाय ती नवमतवादी आहे. नवऱ्याच्या नांवावर विकून घ्यायची तिची इच्छा नाहीं." तो गृहस्थ चिरचिरला.

" वारे वा **सौ. कुमारी** ! " मीं जरा कडू तोंड करीत शेजारच्या त्रिकुटाकडे मान वळविली.

पण तें ऐकायला तिथं होतं कोण. विशा न् बन्या पाठोपाठ जातांना दारांत दिसले आणि मीहि त्यांचा पाठलाग करीत पळालों.

---

( लघुनिबंध )

## ७ वेडे विचार

श्री. राजा केंभावी ( विजापूर )

" कसला विचार, करतोस राजा ? "

अष्टमीच्या चंद्राकडे माझ्या खोलींतल्या खिडकींतून मी बघत असतांना मनोहरनें पाठीवर थाप मारीत विचारलें.

" कांहीं नाहीं. उद्योग नव्हता म्हणून पहात होतों झालं या चंद्राकडे."

"डोळे जरी पहाण्याचें काम करीत असले तरी डोकें कसला तरी विचार करीत असेलच कीं."

" चंद्राला पाहिलं तर मनुष्याचं मन कां प्रसन्न होतं याचा विचार करीत होतों म्हण हवं तर."

" पण मी म्हणतों, असला विचार करण्याची जरुरीच काय मुळीं ?"

" कां ?" मीं विचारलें.

" एखादं सुंदर चित्र पहातांना आपल्या मनांत त्या चित्रकाराला तें चित्र काढतांना पडलेल्या श्रमांची कल्पना करूं लागलों तर त्या चित्रसौंदर्यानें होणाऱ्या आनंदाचा उपभोग घेतां येईल कां आपल्याला ? तसंच या निसर्गाच्या या सुरेख चित्रांनीं मनाची खिन्नता नाहींशी होऊन तें प्रसन्न होतं ना ? मग झालं तर. तें तसं कां होतं याचा विचार करण्यांत काय अर्थ आहे ?"

" मला नाहीं पटत तुझं म्हणणं."

" कसं पटेल, बाबा ? तुम्हां लेखकांना नाहींतरी असले **वेडे विचार** करण्याची खोडच असते मुळीं." मनोहर म्हणाला.

" बरं, तें जाऊं दे. नाहींतर यावरच लांबलचक व्याख्यान देशील."

मग तो माझ्याशीं बराच वेळ गप्पा मारून निघून गेला.

परंतु तो असतांना काय किंवा गेल्यावर काय, डोळ्यांत गेलेला बारीकसा खडा जसा खुपत राहतो, तसा एक प्रश्न माझ्या मनांत घोळूं लागला !

कांहीं कांहीं वेळेला मनुष्य उगीचच विचार करीत असतो तें कां ? मनोहरच्या म्हणण्याप्रमाणें ते खरोखरीच वेडे असतात कीं काय ? चंद्राच्या प्रशांत चांदण्यानं मन कां प्रसन्न होतं याचं कारण शोधणारी माझी बुद्धि आतां या प्रश्नाचें उत्तर शोधूं लागली !

मनुष्य अगदीं एकटाच असला, त्याचें मन कसल्याहि उद्योगांत गुंतलेलें नसलें, डोळे कांहींतरी वाचीत अगर कशाकडे उत्सुकतेनें पाहत नसले किंवा ओठ कांहीं गाणें गुणगुणत नसले म्हणजे तो कसला तरी विचार करूं लागतो. **त्या कसल्या तरी विचारांनाच मनोहर वेडे विचार म्हणत असावा.** विचारशक्तीच्या जोरावर मनुष्य आपल्या रमणीय भविष्यकालाचीं परिपूर्ण चित्रें रंगवून त्यांकडे उत्कंठापूर्वक नजरेनें पहातो, जन्माच्या जोडीदारणीचें आपल्या मनासारखें चित्र रंगवून तिच्याशीं कोणते प्रणयाचे खेळ खेळावेत हें मनाशीं ठरवितो. यापुढेंहि कल्पनेची मजल जाऊन आपल्याला होणाऱ्या मुलांमुलींचीं कोणतीं नांवें ठेवावींत याचाहि विचार करून ठेवितों, किंवा आपण नामवंत पुढारी होऊन जग आपल्या पराक्रमाची पूजा करीत आहे हें पाहून आनंदित होतों. आपली महत्त्वाकांक्षा ह्मणजे तरी काय ? आपल्या भावी सुखमय आयुष्यासंबंधीं नक्की ठरवून टाकलेले विचारच नाहीं तर काय? बरेच दिवस विचार करकरून कल्पनांनीं रंगविलेल्या मोठेपणाची प्राप्ती करून घेणें किंवा करून घेण्याचा प्रयत्न करणें म्हणजेच महत्त्वाकांक्षा नव्हे का ? सफल झाली तर महत्त्वाकांक्षा नाहींतर शेखमहंमदी विचार, **वेडे विचार** ! समुद्राला मिळून त्याच्याशीं एकजीव होणाऱ्या नदीचा उगम ओबडधोबड पर्वतांत किंवा डोंगरांतच असतो ना ? कर्तृत्वाच्या पंखावर बसून कीर्तीच्या आकाशांत भराऱ्या मारणाऱ्या थोरथोर माणसांच्या महत्त्वाकांक्षांचा उगम याच किंवा असल्याच विचारांत असतो ! आजचे या इलाख्याचे पंतप्रधान

ना. खेर यांना पाळण्यांत घालून नांव ठेवतांना त्यांच्या वडिलांनीं-गंगाधरपंतांनीं आपला मुलगा कै. लोकमान्य टिळकांसारखा कीर्तिवंत पुढारी व्हावा म्हणून त्याचें नांव 'बाळ' असें ठेवलं म्हणे ! त्या वेळीं कित्येकांना हा विचार वेडा वाटला असेल. पण आज—

मग असले विचार वेडे कसे ? आणि असले तरी ते सुखावहच नाहींत कां ? नाटकांतल्या वेड्या पात्रांच्या बोलण्यानें आपण हंसतों, त्यांच्या कृतीनें आपली करमणूक होते व आपल्याला मनोरंजनाचें सुखहि आयतेंच मिळतें. तसेंच कंटाळलेल्या मनाचा,—एकांतवासांत करमणूक पाहिजे म्हणून हट्ट धरणाऱ्या मनाचा-शीण नाहींसा करून आपल्याला मनोरंजनाचें सुख मिळवून देत नाहींत का हे विचार ? 'प्रभात'च्या शांतारामबापूंनीं आपल्या एकांतांत घड्याळासंबंधीं असले विचार केले नसते तर त्यांना 'कुंकू'तल्या काकासाहेबांच्या छातींतल्या धडधडीचें प्रतीक म्हणून घड्याळाच्या लंबकाच्या हालचाली दाखवितां आल्या असत्या कां ? या वेड्या विचारांतून अगदींच कांहीं जरी निष्पन्न झालें नाहीं तरी ते आपल्या मनाची करमणूक करतात हा काय कमी फायदा आहे ? म्हणूनच मी म्हणतों **वेडे विचार** हे रिकाम्या मनाचें आनंददायक चाळे आहेत.

पण हें सारें केव्हां होईल ?

प्रतिकूल परिस्थितीशीं झुंज खेळावी लागणार नाही, उद्यांची भ्रांत पडून पोटांतल्या कावळ्यांची कावकाव सुरू झाली नाहीं, समाजांतली विषम स्थिति पाहून मन करपलें नाहीं, वरचेवर येणाऱ्या दुःखाच्या दडपणानें शरीर खंगलें नाहीं, एकजुटीनें तुटून पडणाऱ्या चिंता-काळजीनें मन खचलें नाहीं—तोंवरच हे वेडे विचार आपल्या मनांत येतील; व आपली करमणूक करून आपल्याला पाहिजे असलेलें मनोरंजनाचें सुख विनामूल्य देतील. आपण आनंदानें वेडे अगर दुःखानें हतबल झालों नाहीं तरच हे विचार आपल्या मनाच्या क्षितिजावर उगवतील !

हे विचार वेडे असले, पोरकट असले तरी मला फार आवडतात ! वेडींबिद्रीं किंवा काळींसावळीं मुलं नाहीं कां त्यांच्या आईला आवडत ? शिवाय असल्या वेड्या विचारांनीं मला आनंद होतो, व समाधानहि लाभतं. या आनंदाच्या समाधानांतच सुखी असतांना स्वतःवरूनच जग ओळखायचं झालं

तर साऱ्या मनुष्यप्राण्याला असले विचार करणें आवडत असेल! लोक आपल्याला हंसतील, मित्रमंडळी आपली कुचेष्टा करतील या भीतीनें कदाचित् कांहींजण, "असले विचार करण्याच्या विरुद्ध आहोंत" असें वरवर दाखवून स्वत:शींच असले विचार करण्यांत तासचेतास घालवीत असतील! गाण्याचा विलक्षण कंटाळा असणारा मनुष्य, आपला भसडा आवाज ऐकून हंसणाऱ्या लोकांच्या नजरा चुकवून स्वत:शीं गुणगुणतोच की!

परंतु लोकांना **वेडे विचार** आवडतील कीं नाहीं याचा विचार करणेंच वेडेपणाचें नाही कां?

---

## ८ परान्नभोजनप्रिय कोण? स्त्री कां पुरुष?

**श्री. श्रीपाद रघुनाथ भिडे**

(वि. सू. हा लेख हिंदुभोजन पद्धतीवर टीका करण्याच्या दृष्टीनें लिहिलेला नाहीं.)

"नाहीं तरी बायकाच अधिक भोजनप्रेमी असतात. हो! आपली गोष्टच निघाली म्हणून मी म्हणतों." मी मुद्दामच सौभाग्यवतीला चिडवण्याच्या हेतूनें म्हटलें. असल्या प्रकारचे वितंडवाद चहाच्या वेळीं नेहमीच आमचे चालत. एखाद्या विषयावर खूप वादविवाद करावयाचा व त्याचं पर्यवसान एखादी फिल्म पाहावयास जाण्यांत व्हायचं हे आमच्या अगदीं अंगवळणींच पडलं होतं. सदरहू प्रमाणें आमचा आज परान्नभोजनप्रेमी कोण? स्त्री कां पुरुष? ह्या विषयावर वाद चालला होता. मागें एकदां अशाच प्रकारच्या वादांत तिनं मला नामोहरम केलं होतं त्याचं उट्ट काढण्याची ही संधी उत्तम आहे असें वाटून मीच मुद्दाम आजचा वाद उकरून काढला होता.

हा महिना श्रावणाचा, म्हणजे हिंदूंच्या, विशेषत: बायकांच्या सणांचा हा सुवर्त्ता काळ होय. बाबांनीं सोमवारीं गुरुजींना लघुरुद्राला व जेवायला बोलवावयाला सांगितलें होतें. आमची सौभाग्यवती Bombay University ची मॅट्रिक होती, व एक वर्ष कॉलेजच्या रेसिडेन्सींत तिनं काढलं होतं एवढं सांगितलें म्हणजे तिचं स्वभावचित्र व

वागण्याची पद्धत वाचकांच्या मन:चक्षूंपुढें येण्यास मुळींच विलंब लागणार नाहीं. मी कॉलेजशिक्षण घेतलेलें नाहीं अशांतला भाग मुळींच नाहीं. चांगला B. A. Hons. आहें. इंग्लिश घेऊन. परंतु हल्लींच्या कॉलेजिएन्सच्या पंथांतील मात्र मी नव्हे. मला कित्येक गोष्टी आवडत नसल्या तरी केवळ वडील माणसांचीं मनें दुखवलीं जाऊं नयेत म्हणून मी त्या आचरण्याची दक्षता बाळगत असें. परंतु आमच्या सौभाग्यवतीचा स्वभाव अतिशय करारी असे व मनाचा ताठा पण भारीच; तरी सुद्धां माझ्या सहवासानेंच ती नमतें घेण्याच्या बाबतींत बरीच माणसाळली होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. लघुरुद्र करावा,भटजींना जेवावयाला बोलवावें वगैरे गोष्टी मला आवडत असत अशांतला भाग नसला तरी मला त्याचा तिटकाराहि पण येत नसे. थोडक्यांत सांगायचें म्हणजे घरगुती व धार्मिक बाबतींत माझ्या मतांचें शीड बाबांच्या मनानें झुकत असे.

"भटजी उद्यां लघुरुद्राला येणार आहेत तेव्हां त्यांची सर्व तयारी करून ठेव" असें मी तिला सांगितलें मात्र तों तिच्या सुप्तावस्थ स्वाभिमानाला जागृति आली व तिनें आपलें वाक्शस्त्र भटजींवर व ओघाओघानें सर्व पुरुष जातीवर सुद्धां "**परान्न-भोजन-लालसी**" असा शेरा मारण्यापर्यंत उचललें. हा वेळपर्यंत मी अगदीं स्तब्ध होतों. परंतु सबंध पुरुष जातीवर एखाद्या (आमच्या) स्त्रीमुखांतून निघालेले असे हीन उद्गार मला खपले नाहींत. माझी शांति ढळली व वादाला तोंड फुटलें.

"पुरुषापेक्षां स्त्रीच जास्त परान्नभोजनप्रेमी आहे हें मी तुला सप्रमाण सिद्ध करून देतों. उलट पक्षीं पुरुष परगृहीं भोजन निमंत्रण नाकारतो याचीं किती उदाहरणें म्हणून सांगूं?" मी आवेशानें बोलत होतों.

"म्हटलं मी सुद्धां शेंपन्नास उदाहरणं देतें पुरुषांच्या परान्नभोजन लालसेचीं." ती केसांच्या बटेंत आंकडा खोचीत असतां म्हणाली.

"हे पहा, अशा बाष्कळ प्रास्ताविकांत वेळ घालविण्यापेक्षां आपण मूळ वादाकडेच वळूं या," चहाचा एक घोट घेत मी म्हणालों. स्त्रीपुरुषांच्या जन्मापासून मृत्यूपर्यंतच्या सर्व भोजन प्रसंगांचा ऊहापोह करण्याची ही संधी उत्तम आहे हें पाहून मी म्हटलं. "असं पहा, स्त्री जन्माला आल्यापासून परान्नभोजनप्रेमी होण्याचें शिक्षण मातेकडून घेत असते. लग्न होईपर्यंत

म्हणजे कौमार्यावस्थेंत स्त्री हरतालका, गौरी, महालक्ष्म्या, दुर्गादेवीचीं नवरात्रें, चंपाषष्ठी, संक्रान्ती वगैरे एक ना दोन हजार प्रसंगीं कुंवारीण म्हणून जेवायला जात असते. तसं आमचं पुरुषांचं नाहीं. लग्न होईपर्यंत तो ब्रह्मचर्यावस्थेंत असतांना, कोणी त्याला ब्रह्मचारी म्हणून जेवायला नाहीं बोलावीत व मुंज होईपर्यंत तर हक्कानें जेवायला जाण्याला मुलगा अगदीं invalid असतो. मुंजीपासून सोडमुंजीपर्यंतच validity काय ती जोरांत असते."

"तरी बरं आहे, आई मुंज होईपर्यंत मुलाला नेहमीं आपल्याबरोबर घेऊन जात असते म्हणून–आणि मुंजीनंतर तर चांगला ब्राह्मण होतो बाटेल तेथें सर्रास जेवावयास जायला. मुंजींत अष्टवर्गे घालतात ते सुद्धां मुलांचेच, अष्टवर्ग्या कुंवारणी घालतात कां कुठें!" ती स्त्री जात्यभिमानानुसार बोलत होती. "मुंजीपूर्वी आईवडिलांबरोबर व मुंजीनन्तर ब्राह्मण, एकूण काय सारा जन्म **परान्न-भोजन-प्रेमी—**"

"वडील शब्द वगळ,"—मी तिला थांबवून म्हटलें. "आईच असलं शिक्षण देते मुलांना. आम्ही मुलांना जेवायला न्यायला मुळीं कधीच तयार नसतों. फार कशाला परवांचच उदाहरण घे ना! राघोपंतांनीं सुभाषला जेवायला बोलावलं असतांना सुद्धां मी त्याला नेलं नाहीं आपल्याबरोबर, आणि तेंच तुला सुमतीबाईनीं एकटीलाच डोहाळजेवणाला बोलावलं असतांना सुद्धां तूं सुभाषला आणि रजनीला घेऊन गेलीस...... **परान्न भोजनप्रियता बायकांच्या अगदीं हाडींमासींच खिळलेली आहे** त्याला तूं तरी कशी अपवाद ठरशील?"

"बरं ते राहूं द्या, पण सोडमुंजीच्यानंतर तर मुलगा भोजनाच्या कामांत गृहस्थ बनतो ना?"

"अग पण पुरुषांना असे भोजनाचे प्रसंग येतात तरी कुठें? फारफार तर लग्नमुंजीला. पण तुम्ही देखील तिथें असतांच कीं. **लग्नानंतर स्त्रियांचे परान्नभोजनप्रसंग वाढूं लागतात,** तर पुरुषांचे बाबतींत ते कमी होतात."

"मुळींच नाहीं, दोघीहि अगदीं सारखेच. फक्त काळवेळाचाच फरक" ती हा मुद्दा प्रामुख्यानें मांडत होती.

" अग पण हें पहा—स्त्रीपुरुषांचा लग्नमुंजीपर्यंतचा काळ पाहिला तर स्त्री हीच पुरुषांपेक्षां जास्त वेळां परगृहीं भोजन घेते. "

" कल्पना आहे तुमची. स्त्रीला केळवणाचे प्रसंग एकदांच फक्त लग्न-प्रसंगीं येतात, पण पुरुषांना मुंजीच्या वेळीं एकदां व पुढें होतील तितक्या लग्नप्रसंगीं. " आपण कांहीं तरी नवा मुद्दा काढला ह्या अभिमानानें ती बोलत होती.

" पण माझे आई ( ? )– पुरुषांना लग्न झाल्यावर प्रत्येक वेळेस गर्भार असल्यास डोहाळजेवणं नाहीं मिळत स्त्रियांप्रमाणें. पुरुषांना दोनदां केळवणं मिळत असली तरी बायकांना अनेकदां डोहाळजेवणं मिळतात त्याची काय वाट ! "—मी तिचा मुद्दा खोडून काढण्याचा प्रयत्न केला.

" इश्श, कांहीं तरीच बाई बोलणं—अन् म्हटलं प्रत्येक गर्भारपणीं नाहीं कोणीं डोहाळजेवणं देत. फक्त पहिल्या खेपेसच. "

" समजा, पण त्याच वेळेस, तुम्ही पुढील सर्व खेपांचं उट्टं काढून घेतां," मी हांसत उद्गारलों.

" आतां बोलायचंच झालं म्हणून मी म्हणतें—मुलांना दोनदां घांस मिळतो, एकदां मुंजींत मातृभोजनाचे वेळेस आणि दुसरा लग्नांत—तसं पाहिलं तर बायकांना एकदांच मिळतो हा मान."

" तुला जर त्यांत मोठेपणा वाटत असेल—तर आपण रोजसुद्धां घांस द्यायला तयार आहों ! हो ! काय त्याला लागतो खर्च !"

" इश्श, पुरे बाई ती चेष्टा. पण अशांनीं मीं काय मूळ मुद्दा विसरून जायची नाहीं म्हटलं " ती लाजून, रुमालानं तोंड पुसत म्हणाली.

" बरं डोहाळजेवणांच राहू दे, पण श्रावणांतल्या मंगळागौरी व नवरात्रांतली अष्टमी मिळून ६—७ दिवस परगृहीं पुरवा झोडतां त्या वेळचं कुठं गेलं? "

" अन् श्रावणीच्या दिवशीं सुद्धां तुम्ही दुसरीकडे जेवायला जातां त्याची कांहीं शिरगणती !"

" अहो पण बाईसाहेब, मंगळागौरीप्रमाणें श्रावण्या कांहीं आठ दिवसांनीं नसतात. "

" कित्येक बायकांचा तर मुळीं सवाष्ण जेवायला जायचा अगदीं धंदाच असतो. " मी तिला डिंवचण्यासाठींच म्हणून उत्तरलों.

" पुरुषज्ञातींत भटजींनीच ही परंपरा चालू केली आहे. जेवायला जातात तर जातात आणखी वर गोविन्दविड्यासह दक्षिणा उपटतात. "

" पण हे पहा, भटजी जेवायला गेले, तर कांहीं तरी मंत्र वगैरे म्हणतात, अन् मग गोविन्दविडयासह दक्षिणा घेतात—पण—सवाष्ण बायका कांहींएक मंत्रोच्चार न करतां गोविन्दविडयांसह दक्षिणा तर घेतातच, पण शिवाय ओटी भरून घेतात. मग सांग ह्या ठिकाणीं उपटसुंभेपणा स्त्रीच पुरुषापेक्षां जास्त करते कां नाहीं ? "

" पण सवाष्ण जेवायला जाण्याचा धंदा करणाऱ्या स्त्रिया भटजीइतक्या विपुल नसतात. "

" खानेसुमारी करायला कोण गेलं आहे त्यांची ? तेवढाच धंदा करायचा झाला तर मी देईन संपूर्ण Statistics सवाष्णींचं. "

" मेहुण जेवायला जायचा प्रश्न राहूं द्या—कारण दोघांच्याहि हजेरी-शिवाय मेहुणांची मुळीं सिद्धताच होत नाहीं ? " ती Compromise करण्याच्या दृष्टीनें म्हणाली. झालं हें पुरें नाहीं, असं वाटून मीं नव्या मुद्यांस चालना दिली—

" बरं, एखाद्या स्त्रीचा नवरा वारल्यावर ती अनाथ ( गरीब असली तरच ) तिला स्वयंपाकीण बाई म्हणून पाचारण करण्यांत येतें. पण तसं कांहीं विधूराला नाहीं कोणी आचारी अगर वाढपी म्हणून बोलावीत. एखादा गरीब गृहस्थ केवळ विधुरत्वानें आचारी होऊं शकत नाहीं, पण तेंच एखाद्या स्त्रीचें वैधव्य तिला सहज जेऊनखाऊन ७-८ रुपयेवाली स्वयंपाकीण बाईची नोकरी देतं. ह्यावरून सुद्धां परान्नभोजनप्रियता स्त्रीच्या ठिकाणीं कशी उत्कटतेनें वास करते हें दिसून येईल.

" केवळ अनाथ व सनाथ ह्या दृष्टीनें पाह्यचं झालं तर मधुकरी वृत्ती पुरुषांच्या ठिकाणींच प्रबळ असते. माधुकरी मागणारीं गरीब मुलं थोडीं कां असतात ? माधुकरी मागणाऱ्या गरीबांच्या मुली निदान माझ्या तरी ऐकिवांत नाहींत, ह्यावरून तुम्ही काय ताडणार ? " तिनें मला हा सहज ( ? ) सवाल टाकला.

" तूं कांहींहि म्हण बाकी पुरुषांपेक्षां स्त्रियाच अधिक परान्नभोजनप्रिय असतात. "

" मुळींच नाहीं—तुम्ही पुरुषच भोजन—निमंत्रणासाठीं टपून बसलेले असतां— अगदीं बकध्यानी "—ह्या वेळीं बकंभटाची स्वारी द्वारीं प्रगटली तेव्हां आमच्या वादाला पूर्णविराम तेथेंच देणें प्राप्त झालें.

---

## ९ मजुरांचा देव

श्री. महादेव विनायक ताथवडकर

'अमृत प्रगट झालें हें...' 'अमृत-मंथन' मधील शेवटचें पद भसाड्या आवाजांत गात व बेसूर ताना मारीत मी माझ्या बॅगमध्यें कपडे भरीत होतों मी जिच्याकरितां आज दीड वर्षे झुरत होतों, जिच्या पाठीमागें धांव घेत होतों, त्या माझ्या प्रीतिदेवतेनें माझ्यावर आज पूर्ण कृपादृष्टी दाखविली होती. त्या माझ्या भसाड्या गायनापासून जरी शेजारच्या खोलींतल्या लोकांना त्रास होत होता, त्यांना जरी तें ऐकवत नव्हतें, तरी मी मात्र त्यांत अगदीं रंगून गेलों होतों. त्यांत मी इतका तल्लीन झालों होतों कीं, सुरेश-माझा जानी दोस्त-ढकललेलें दार उघडून आंत आला व त्यानें एकदोनदां हांक मारली तरी मला मात्र त्याची दादहि नव्हती. अखेर त्याच्या पलंगावर बसण्यानें जेव्हां करर असा आवाज झाला तेव्हां मीं तिकडे चमकून पाहिलें.

" खोलींत चोर शिरले तरीसुद्धां तुला कळणार नाहीं." तो हंसतहंसत म्हणाला.

" आणि आले तरी काय त्यांना इथं मिळणार ? " आम्ही दोघेहि एकदम हंसलों.

" कुठं निघालास ? "

" गांवाला. "

" कोणत्या ? "

" × × × "

" कां ? "

" तिथं माझी देवता आहे. "

" असं कां ? इतक्या दिवस कुठं होती ? "

" कुणाला माहित. उभ्या आयुष्यांत पहिल्यानेंच चाललोंय तिच्याकडं. दीड वर्ष झालं तिच्या भेटीचा प्रयत्न करतोंय ! "

" अरे वा ! आपल्या अधिष्ठात्री देवतेचं नांव कळेल कां ? "

" हो. "

" काय ? "

" नोकरी. "

तो आश्चर्यानें मजकडे पाहूं लागला. नि मग मीं त्याला सर्व हकीकत सांगितली.

" तीनचार दिवसांपूर्वी मी नेहमींच्या सरावाप्रमाणें वाचनालयांत जाऊन ' सकाळ ' मधल्या ' पाहिजेत 'च्या जाहिराती पहात बसलों होतों. त्यांतल्या एका जाहिरातीवर माझें लक्ष खिळलें.

**पाहिजे.**

× × × येथील साखरेच्या कारखान्यांत एका मॅकॅनिकल एंजिनिअरची जरुरी आहे. तरी गरजूंनीं ता. ३० चे आंत अर्ज पाठवावेत.

—मॅनेजर,

लक्ष्मी शुगर वर्क्स लि. × × ×

मन आशावादी असतें हेंच खरें. माझी बहुतेक ठिकाणीं जरी निराशा झाली होती तरी येथें मात्र आपणांस खात्रीनें नोकरी मिळेल असें वाटत होतें. मी लगेच वाचनालयांतून घरीं आलों व अर्ज खरडून पोस्टांत टाकला. आज सकाळपर्यंत माझ्या मनांत आशा निराशेचा मोठा झगडा चालला होता. पण आज त्यांचें अनुकूल पत्र आल्यानंतर आनंद तर झालाच पण थोडेंसें आश्चर्यहि वाटलें.

" आश्चर्य ? नि तें कां बुवा ? " त्यानें विचारलें.

मी कांहींच उत्तर न देतां टेबलावर पडलेलें, वांकडेंतिकडें फाटलेलें पाकीट उचललें व त्यांतून एक कागद काढून वाचूं लागलों.

ता. २८-७-१९३५

प्रिय वसंत,

कितीतरी वर्षांनीं आपण एकमेकांना पत्रद्वारें तरी भेटत आहोंत. आपली ताटातूट झाल्याला सहासात तरी वर्षें सहज झालीं असतील नाहीं ? पण लवकरच पुन्हां आपण एकत्र येणार हें पाहून मला खरोखरच फार आनंद झाला आहे. आतां आपण खूप टेनिस, ब्रिज, कॅरम वगैरे खेळूं तूं कदाचित् मला पोरकट म्हणशील. पण तूं येणार या कल्पनेनें मला इतका आनंद झाला आहे कीं त्यापुढें तूं कोणतेंहि विशेषण दिलेंस तरी त्याचें कांहीं वाटणार नाहीं मला !

आपण इंटरमध्यें असतांना आपली ताटातूट झाली. पुढें मला घरच्या परिस्थितीमुळें शिकतां आलें नाहीं. पण नंतर दोन तीनच महिन्यांनीं माझ्या एका दूरच्या नातलगानें हा कारखाना काढला व तींत मला नोकरी लागली. आतां मी या कारखान्याचा मॅनेजर आहें.

मला इतक्या दिवस वाटत होतें कीं तुला कोठेंतरी नोकरी लागून कदाचित् तूं संसारहि थाटला असशील. पण काल जेव्हां तुझा अर्ज पाहिला तेव्हां फारच आश्चर्य वाटलें.

आतां ती जागा तुझ्याकरितांच आहे. पत्र पाहतांच लगेच दुसऱ्या गाडीनें नीघ. मी तुझी वाट पाहत आहें. हें कारखान्याचें आज्ञापत्रच आहे असें समज.

तुझा मित्र,
विलास देशपांडे."

" आहे बुवा ! " पत्राचें वाचन झाल्यानंतर तो मला म्हणाला.

सुरेश मला स्टेशनपर्यंत पोहोंचवावयास आला होता. गाडीनें शीट दिली. मी सुरेशशीं हस्तांदोलन करून गाडींत जाऊन बसलों. गाडी सुरू झाली.

" अच्छा, सुरेश."

" अच्छा " तो सद्गदित अंतःकरणानें म्हणाला. " पत्र पाठव हं. "

" हं. "

( २ )

सकाळीं ६ ला मी ××× ला पोहोंचलों. सर्वत्र शांततेचें साम्राज्य पसरलें होतें. फक्त 'चाई गरम' व 'साहेब हमाल' असें ओरडणाऱ्या पोऱ्यांच्या आरोळ्या मात्र शांततेचा भंग करीत होत्या. मीं आजूबाजूला पाहिलें पण मला विलास कुठंच दिसेना. मला आश्चर्य वाटलें व मनांत म्हटलं, अजून साखर झोपेंतच असेल स्वारी. मीं सर्व सामान डब्या-बाहेर काढलें व पोऱ्याला बोलावणार इतक्यांत " आपण विलासांकडेच आलां आहांत ना ? " असा मंजुळ आवाजांत प्रश्न विचारला गेला. मीं चमकून मागें पाहिलें तों एक अठराएकोणीस वर्षांची सुंदर युवती माझ्याकडे हंसऱ्या नजरेनें पहात उभी होती.

" हो " मीं उत्तर केलें.

" चला तर, मी त्यांच्याकडूनच आलें आहें. "

"विलास अजून झोंपलाय वाटतं ? " मोटारींत बसतांना मीं हंसतहंसत विचारलें.

" नाहीं, नाही" तिनेंहि हंसतहंसतच उत्तर दिलें. "आज त्याला जरा कारखान्यांत काम होतं म्हणून त्यानं मला पाठविलं. "

मोटार सुरू झाली. जरा वेळानें मीं विचारलें ?

" पण तुम्हीं मला कसं ओळखलंत ? "

" विलास एक उदयोन्मुख लेखक आहे माहित आहे ना, तुमचें हुबेहुब वर्णन केलं होतं त्यानं. नि शिवाय तुमचा एक फोटोहि आहे त्याच्याजवळ ! "

( ३ )

दीड वर्षे सर्व व्यापार सुरळीत चालले होते.

कांहींच उद्योग नव्हता म्हणून मी त्या दिवशीं सकाळीं विलासच्या ऑफिसांत गेलों होतों. विलास कसल्या तरी कामांत गुंग झाला होता. नन्दिनी—विलासची बहिण—तेथें नुकताच टपालांतून आलेला ' किर्लोस्कर ' चाळीत आरामखुर्चीत बसली होती. " तुम्हांला एक गम्मत माहीत आहे कां ? " मी खोलींत प्रवेश करतांच तिनें विचारलें.

" नाहीं. काय ? "

" आमच्या दादाचा लेख आलाय 'किर्लोस्कर' मधें."

" असं का ? कोणता ? "

" 'मजूर नि मालक यांचे परस्पर संबंध' " असें म्हणून तिनें माझ्याकडे तो अंक फेंकला.

सर्व लेख वाचून झाल्यानंतर माझा विलासबद्दलचा आदर तर द्विगुणित झालाच, पण मला माझ्या कारखान्याबद्दलहि थोडा जास्तच अभिमान वाटूं लागला व मनांत विचार आला, " सर्वच कारखान्यांना जर विलाससारखे मजुरांच्याबद्दल सहानुभूति बाळगणारे मॅनेजर मिळाले असते तर......"

" साहेब," आमच्या कारखान्यांतला एक मजूर दारांत उपस्थित झाला.

या त्याच्या व्यत्ययामुळें विलास बराच त्रासला असावा. त्यानें आपलें कागदांत खुपसलेलें डोकें किंचित् वर करून व कपाळाला दोनतीन आंठ्या घालीत विचारलें, " काय काम आहे ? "

" तीन महिन्यांचा पगार राहिलाय, साहेब. दोन महिनं काढलं कसं तरी. पण आतां काय उपायच नाहीं. कारभारीण अन् एक प्वार तापानं नुसतं फणफणतयं. घरातलं दाणं बी संपल्यात. फारच पैशाची निकड आहे बगा." तो अगदीं केविलवाण्या मुद्रेनें सांगत होता.

"कॅशरकडे गेला होतास कां?" विलासनें त्याच्याकडे न बघतांच विचारलें.

" व्हय. पण ते म्हणालं, पगाराचे सर्व पैसे देऊन सुद्धां टाकलं. आतां उरलेल्याचं पगार पुढच्या महिन्याला. म्हणून तर आपणाकडं आलों."

" आतां तर कांहीं आपल्याजवळ पैसे नाहींत. मग ? " विलास म्हणाला. नंतर थोडा वेळ विचार केलासें करून त्यानें पुन्हां सुरुवात केली, " आतां असं कर, जसे गेले दोन महिने काढलेस तसाच हा पण काढ कसा तरी. अन् पुढच्या महिन्याला तुझा चारी महिन्यांचा पगार एकदम देऊन टाकूं म्हणजे झालं. अं ? "

" पण साहेब, ह्यो महिना तरी कसा काढूं ? घरांत विष खायाला एक फुटकी कवडीबी नाहीं. बायकापोरांना औषध कसं देऊं ? अन् मग घरांत खाऊं तरी काय ? तसं नका करूं. कांही बी करान् एक महिन्याचा तरी पगार द्याच ! "

त्यानं खूप खूप विनवणी केली पण त्याचा कांहींच उपयोग होण्यासारखा नव्हता. त्याच्या लेखानें माझ्या मनांत निर्माण केलेला आदर पार रसातळाला गेला. अखेर शेवटीं मींच त्या मजूराला विचारलें, " किती पगार आहे रे तुला ? "

" बारा. "

माझा पगार मला थोड्याच वेळापूर्वी मिळाला होता. त्यांतले मी २० रु. काढले व त्याच्या हातावर ठेवले. तो मला धन्यवाद देत निघून गेला. विलास माझ्याकडे क्रुद्ध नजरेनें पहात होता. मी तिकडे पाहिलेंच नाहीं.

" आहे बुवा मजुरांचे कैवारी ! ! " नन्दिनी म्हणाली, " नाहीं तर आमचा दादा. नुसता लिहिण्यांतच पाहून घ्या."

"बरं, बरं ! किती शिकलां तरी तुम्हांला व्यवहार नाहींच कळायचा." तो चिडून म्हणाला.

अशा वागणुकीनें मी कामगार लोकांत बराच लोकप्रिय झालों होतों. नन्दिनीच्या आणि माझ्या सहवासाचेंहि प्रेमांत रूपांतर झालें होतें. मी तिच्या-बरोबर सायंकाळीं फिरावयास गेलों नाहीं असा एकहि दिवस गेला नाहीं. विलास व त्याच्या घरांतील मण्डळींना सर्व कांहीं कळून चुकलें होतें. पण त्यांचीहि तशीच इच्छा दिसल्यामुळें त्यांनीं आम्हाला विरोध केला नाहीं.

असेच कांहीं दिवस मजेंत गेले. पण मध्यंतरीं दोन तीन दिवस कारखा-न्यांतील कामामुळें मला नन्दिनीकडे जातां आलें नाहीं. पण नन्दिनी माझ्याकडं कां आली नाहीं याचं मात्र मला राहून राहून आश्चर्य वाटत होतं. शेवटीं तिसऱ्या दिवशीं ज्या वेळीं मला विलास भेटला त्या वेळीं त्याच्याकडून ती तीन चार दिवसांकरितां शेजारच्याच गांवीं राहणाऱ्या मावशीकडे गेली असल्याचें कळलें. नंतर मी जरी देहानें कारखान्यांत काम करीत होतों तरी मनांत मात्र नन्दिनीचाच विचार करीत होतों आणि याचं प्रायश्चित्तहि चांगलंच मिळालं.

माझ्या डिपार्टमेंटमधील कामाचं निरीक्षण करीत मी फिरत होतों. एका मशीनच्या जवळ दोनतीन लोक कांहींतरी खटपट करीत होते म्हणून मी तेथें गेलों व काय झालें तें विचारलें.

"कांहीं नाहीं, हा पार्ट जरा नादुरुस्त झालायं. तो नीट करतोय" त्यांतला एक म्हणाला.

"मग ?"

"अजून कांहीं जमत नाहीं."

मी तो भाग नीट बघून खोलला व दुरुस्त करून पुनः बसवूं लागलों. अन् काय झालं कुणास ठाऊक एकदम मोठा आवाज झाला. माझ्या कपाळावर सणकन् जोराचा टोला बसला नि मी खालीं पडलों. पुढं काय झालं तें कळलंच नाहीं.

अर्ध्या पाऊण तासानंतर मी शुद्धीवर आलों. कपाळाला चांगलीच खोंक पडली होती. तापहि बराच आला होता. मी माझ्या खोलींत पलंगावर पडलों होतों. माझ्या डिपार्टमेंटमधील एकदोन लोक, विलास व डॉक्टर तेथेंच बसले होते. मी शुद्धीवर आल्यानंतर थोड्या वेळानें विलास इतरांना ऐकूं न जाईल अशा आवाजांत मला म्हणाला, "मन ताळ्यावर नव्हतं तर कशाला कामावर आला होतास ?"

"कुणीं सांगितलं मन ताळ्यावर नव्हतं म्हणून ?"

"सांगायला कशाला पाहिजे ! उद्यां येणार आहे नन्दिनी."

थोड्या वेळानं डॉक्टर नि विलास निघून गेले. मला राहून राहून आश्चर्य वाटत होतं कीं असं कसं झालं. म्हणून मी जवळच बसलेल्या एका माणसाला विचारलें तेव्हां तो म्हणाला, "मशीन चालूंच होतं. तो नट बरोबर बसला गेला नसेल आणि त्यामुळें तो एकदम तेथून उडून आपल्या कपाळावर लागला."

दुसरे दिवशीं सकाळीं दहा वाजतांच नन्दिनी माझ्या खोलीवर आली.

"ओ हो ! या ! केव्हां आलांत ?" ती दारांत येतांच मीं विचारलें.

"आतांच ! गाडींतून उतरल्याबरोबर तुमचा प्रताप कळला तेव्हां तशीच इथं आलें !"

जरा वेळ शांतता होती. नंतर तिनें सुरुवात केली.

"आतां आहे कां ताप ?"

"कुणास ठाऊक ! पाहिलाच नाहीं अजून. असेल थोडासा."

तिनें टेबलावरील थर्मामीटर उचलून माझ्या हातांत देत म्हटलें, "औषध तरी वेळेवर घेतां कीं नाहीं ?"

मीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. तिनें औषधाच्या बाटलीकडे पाहलें, तों त्यांतला एक डोस फक्त कमी झालेला.

"आजचं आहे वाटतं हें."

"नाहीं. कालचंच," मी दुसरीकडे बघत उत्तरलों.

"कमाल आहे बाई तुमची, इतके कसे हो तुम्ही स्वतःविषयी निष्काळजी?"

मी मिष्किलपणें हांसत उत्तर दिलें–

"पण पुरुषांना स्वतःची काळजी घ्यावी लागतच नाहीं."

तिनं माझ्याकडे एक अर्थपूर्ण कटाक्ष टाकला.

(४)

त्या वेळीं मी अगदीं सचिंत मुद्रेनें आरामखुर्चीत पडलों होतों. उद्यांपासून कारखान्यांत संप पुकारला जाणार होता. व त्याचें नेतृत्व मजकडे आलें होतें. मीं पुष्कळ विचार केला कीं पुढारीपण कां नन्दिनी? कामगारांचा पुढारी होणें म्हणजे विलासच्या विरुद्ध जाणें व त्याच्या विरुद्ध जाणें म्हणजे नन्दिनीच्या प्रेमळ सहवासास मुकणें. पण अनेकांच्या सुखाकरितां आपल्या सुखाची, सर्वस्वाची होळी झाली तरी हरकत नाहीं असा विचार करून मी धुरीणत्व स्वीकारणार होतों.त्या वर्षी पुष्कळच परदेशीं साखर स्वदेशांत आली, त्यामुळें देशी साखर स्वस्त झाली. आमच्या कारखान्याला तोटा येईलसें वाटलें म्हणून मालकांनीं कामगारांच्या पगारांत कापाकाप सुरू केली. अगोदर कामगारांचा पगार तो काय? नि त्यांतून कपात. कामगार चिडले. त्यांनीं सम्प पुकारला. मी त्यांच्यांत बराच लोकप्रिय होतों. बहुतेक वेळां मी त्यांचीच बाजू घेत असें व म्हणून संपाचें नेतृत्व मजकडे आलें होते.

दोन तीन दिवस संप जोरांत होता. कारखान्याच्या मॅनेजरनें–विलासनें–मला बोलावलें. हुकुमावरून मी त्याच्याकडे गेलों.

"हें असं किती दिवस चालणार?" त्यानें विचारलें.

"मागण्या मान्य होईपर्यंत," मी म्हणालों.

"आणि मान्य नाहीं केल्या तर?"

"उघडच आहे. संप चालू राहील."

"आणि पोलिसांची मदत घेतली तर?"

" सत्तेच्या जोरावर,पैशाच्या जोरावर भांडवलवाले गरीब बिचाऱ्या कामगारांना कसे पिळून काढतात हें जगाला दिसेल. त्यांचेंच रक्त पिळून तुम्ही श्रीमंत होतां. ते तुमच्या उपयोगी पडतात, तुम्हांला श्रीमंत करतात. पण तुम्ही ? तुम्ही मात्र त्यांचें रक्त शोषीतच असतां. आणि कित्येक भांडवलवाले तर त्यांच्या मुलींबाळींनाहि समाजाबाहेर काढतात. काय करतां तुम्ही त्यांच्या फायद्याकरितां ? " एवढें बोलून मी जायला निघालों.

या मार्गानें जेव्हां ही भानगड मिटणार नाहीं असें विलासला वाटलें तेव्हां त्यानें दुसऱ्या युक्तीचा अवलंब केला.

" तुझ्यावर सर्व कामगारांचा विश्वास आहे. तुझ्या एका शब्दावर ते सर्वजण अवलंबून आहेत. तूं जर संप थांबविण्याचें मनांत आणलेंस तरच तें शक्य आहे. बोल, तुझ्या पगारांत आणखी वाढ करतों. हा संप बंद पाडशील कां ? " तो म्हणाला.

" शक्य नाहीं. माझ्या पगारांत वाढ करण्यापेक्षां मजुरांच्या पगारांत कपात न करण्याचें वचन देत असशील तर मात्र संप तावडतोब मिटेल."

" आमच्या विरुद्ध जाऊन तुझा एक मोठा तोटा होणार आहे. तूं आपला जन्माचा जोडीदार गमावशील."

"सर्व लोकांच्याकरितां जन्माचा जोडीदारच काय पण माझं सर्वस्व गमावलं, माझा सत्यानाश झाला तरी मला त्यांत आनंदच वाटेल. "

" तूं माझ्या नन्दिनीचा घात केलास. "

" मी नाहीं, तूंच ! "

( ५ )

संप पोलिसांकडूनच मिटविला गेला. ज्या कारखान्यांत मजुर लोकांच्या मागण्या मान्य केल्या जात नाहींत, त्यांचें म्हणणें खरें असून सुद्धां जेव्हां त्यांना धुडकावून लाविलें जातें तिथें आतां राहण्यांत अर्थ नाहीं असें मला वाटूं लागलें. ज्यांच्या जोरावर आपण चैन करतों त्यांना उपाशीं मारून त्यांचे तळतळाट, शिव्याशाप घेणें बरोबर आहे कां ? पण तो जगाचा न्याय आहे. कष्ट एकानं करायचे नि त्याचा फायदा मात्र दुसऱ्याला मिळावयाचा. मला तेथें राहण्याचा कंटाळा आला. मी राजीनामा खरडून उत्त-

राची वाट न पाहतां जाण्याची तयारी करूं लागलों. कपडे भरतांना सुरुवातीचेच 'अमृत प्रगट झालें' हें पद गुणगुणत होतों. पण त्या वेळीं नोकरी मिळाल्याचा आनंद झाला होता, आतां तत्त्वाकरितां नोकरी सोडल्याचा आनंद झाला होता.

दारावर टक् टक् आवाज झाला. मी एक मोडकीतोडकी तान घेत दाराजवळ आलों व दरवाजा उघडला. मला आश्चर्य वाटलें. नंदिनी माझ्याकडे कशी काय आली ?

ती आल्याबरोबर पलंगावर जाऊन बसली.

" कुठं चाललांत ? " ती घाम पुसतां पुसतां म्हणाली.

" पुण्याला. "

" तुम्ही राजिनामा कां दिलात ? "

मला वाटलं खरी वस्तुस्थिति सांगावी. तिच्या भावाची चांगली खरपूस टीका करावी. पण पुन्हां मनांत विचार आला आतां काय करायचंय आहे आपल्याला.

" उगीच, " मी म्हणालों.

ती निघून गेली. मला वाटलं होतं कीं, निदान ती स्टेशनपर्यंत तरी पोहोंचवायला येईल म्हणून. पण छे ! तें श्रीमंती प्रेम होतं. तें थोडंच चिरस्थायी असणार ? जोंपर्यंत माझी सांपत्तिक स्थिति चांगली होती तोंपर्यंत तिचं प्रेम होतं माझ्यावर. आतां मी बेकार झालों होतों. तिनं जर माझ्यावर आतां प्रेम केलं तर तिला मोटारी उडवायला कशा मिळाल्या असत्या ? मला फार वाईट वाटलें. मी कसंतरी सामान आवरलं व घाईघाईनं स्टेशनवर गेलों. गाडी सुटायला फक्त दोनतीन मिनिटेंच अवकाश होता. मी तिकीट काढून सामान डब्यांत टाकलें व आंत चढतों तोंच गाडी सुटली. मी सामान नीट ठेवून एक जागा पकडली व आजूबाजूला पाहूं लागलों तों काय आश्चर्य. नन्दिनी माझ्या पुढच्याच बांकावर बसली होती. मी चमकून विचारलें, "म्हणजे ! तुम्ही कुठं ? "

ती स्मित हास्य करीत म्हणाली, " जिकडं मजुरांचा देव तिकडंच मजुरांची देवी."

( लघुतम कथा )

१० # अंदरकी बात

**श्री. गोपाळ नारायण ढवळे**

"God's in his heaven
All's 'right' with the world!"

* * *

"शाबास, रामराव..." रामरावांच्या पाठीवर थाप मारीत आनंदराव म्हणाले, "आजपर्यंत केलेली तुमची तपश्चर्या फळाला आली तर..."

"कां नाहीं येणार? आज एक तप मी तपश्चर्या करीत होतों ना!"

"आतां काय भाव आहे तुमचा! रावसाहेब ही पदवी आणि अलोट संपत्ति!!"

रावसाहेब रामराव कॉंट्रॅक्टर(रां)नीं नुकत्याच बांधलेल्या 'अंध-मूक-गृहा'चा अनावरण समारंभ उरकून गव्हर्नरसाहेबांची मोटार पेट्रोलच्य धुरांत अदृश्य होत होती.

आतांच उरकलेल्या 'अल्पोपाहाराचे' सुगंधी ढेंकर देत रावसाहेब आपल्या दातृत्वाचें, कर्तृत्वाचें आणि नेतृत्वाचें रसाळ वर्णन करीत होते.

शेवटीं सोनेरी रिस्टवॉच्कडे नजर टाकून आनंदरावांशीं शेकहॅण्ड करून ते परत वळले.

आनंदराव हातांतील तुऱ्याचा वास घेत फाटकांतून बाहेर पडले.

बाहेर रस्त्यावरच ग्यानू कुणबी दीनवाण्या मुद्रेनें उभा होता.

आनंदरावांनीं त्याला हटकून विचारलेंच—

—"काय ग्यानबा, चैन आहे ना? तुमच्या जागेंत ही संस्था झाली—अभिमान वाटायला हवा तुम्हांला-अन् रावसाहेबांनीं जागेसाठीं किती दिले? —हं—अगदीं छन् छन्?"

"काय अगदीं इचारू नका ते, साब. ख्वापस्यापरि ख्वापटंइ गेलं नि पैसाबी नाइ मिळला." ग्यानूनें उत्तर दिलें.

"म्हणजे! काय झालं? तुझी झोंपडी आहेना संस्थेच्या मागच्या अंगाला?" आनंदरावांनीं आपलेपणाच्या ओलाव्यानें पृच्छा केली.

" कसलं ख्वापटं नि कसलं काय ! ही शाळा झाली नवं..."

" मग त्या शाळेचं काय ? "

" तवां त्येंनीं मांगांनीं माझी झ्वापडीबी दिली उडवूनश्यान्..."

" म्हणजे ? तुझी झोंपडी उडवून काय केलं ?"

" पायखाना बांधला नवं का त्येंनीं .."

" मग तुला पैसे तरी दिले कीं नाहीं थोडेफार ?"

" कसला पैसा, राऽव; द्येतों द्येतों म्हणतायृत पन् द्येत तर नायृत..."

" किती देणार आहेत ? "

" काय पयल्यान् म्हनलं शंबर द्येतों; पन् परवां म्हनूलं 'शंभर ठेवलाय तुझ्या बापुसनं ! पंचीस घे नाय तर द्येतच नाऽय...' "

" कोण म्हणालं ?"

" तो सायब झाला नवं का आता ?..."

" कोण ? तो रावसाहेब झाला तो ?"

" जी; त्योच पघा."

" तर आतां राहतोस कुठें मग ?"

" वनवन हिंडतुया नि ध्वांड्यावर निजतुया..."

" अन मुलगी ? सासरीं गेली का ती ?"

" कसलं सासर आलंय तिला ! मेली नाह्‌ कां ती ? दोन दीसच तर झाले..."

" कशानं मेली ?"

" आतां काय सांगूं तुम्हांला, रावसाऽब...; ती 'शिक ' व्हती अन् त्येच दिशीं त्येंनीं झ्वापडी मोडली नवं कां ? चार दीस ध्वांड्यावर निजून-निजून तर मेली..."

* * *

रावसाहेबांच्या ' अंध-मूक-विद्यालया'च्या पाटीवरील झेंडूच्या फुलांची माळ अजून सुकली नव्हती.

जाणारा येणारा प्रत्येक मनुष्य तिकडे पहात होता—

आणि म्यानूहि !

११

# पाषाणाचा देव

श्री. शंकर कालेकर

जेवण आटोपून बैठकीच्या खोलींत मी नुकताच येऊन आरामखुर्चीवर पडलों होतों.

" ऐकलत कां ! भाव्यांचा मधू फार आजारी आहे. " सुपारी देण्याकरितां आलेली माझी पत्नी म्हणाली.

" असेल ! काय करायचंय मला ? " मीं जरा बेफिकिरी दर्शवीतच म्हटलें.

तिच्या या असल्या उठाठेवी नेहमींच्याच चालायच्या. लोकोपयोगी कार्याचा मला नेहमीं तिटकारा असे. याला कारण मला माझ्या बाळपणांत आलेले कटु अनुभव असोत अथवा पुढें झालेलें न्यायाधीशाचें एकलकोंडे जीवन असो—माझं सर्वसाधारण जगाविषयी तितकंसं बरं मत नव्हत. तिचा मात्र अगदीं माझ्या उलट स्वभाव होता. जिथंजिथं माझी बदली होई तिथं तिथं ती महिलांच्या चळवळींत रमून जायची. ही संस्था काढ, त्या संस्थेचे सेक्रेटरी हो, नडलेल्या गरीबांना मदत कर—यांत ती नेहमींच गर्क असायची. मला तिचा हा स्वभाव तितकासा पटत नव्हता; परंतु तिच्या एकंदर गोड स्वभावाकडे पाहून नेहमीं मी कानाडोळा करी या दोषाकडे.

" गांवच्या उठाठेवी करायला थोडाच मी मोकळा आहें ?" हंसतहंसत मीं तिला टोमणा मारला. आणि मुद्दामच तिच्याकडे पाठ करून खुर्ची फिरविली.

" म्हटलं मुलाच्या औषधाकरितां दहापंधरा रुपयांची जरुरी आहे काकूंना. " जवळ येऊन माझ्या डोक्याच्या केसांशीं लडिवाळपणा करीत ती म्हणाली.

" काकूंना आणि पैसे ! कोठून आमच्याजवळ असणार ? पैसे मिळणार नाहींत काकूंना." मी खोचक पण निक्षून म्हणालों. ती एकदम मनांत चरकल्यासारखी झाली.

" कां ? काकूंना कां नाहीं करणार मदत ?" माझ्यासमोर पलंगावर बसत ती म्हणाली.

" तूंच सांग, कां करावी ? " मी एकदम म्हणालों. " सलू, हें जग दिसतं तसं नाहीं. तूं बायको–"

" हो आहेंच कीं." मला हंसविण्यासाठीं ती मध्येंच म्हणाली. गंभीर झालों होतों मी.

" हंसून चेष्टा करूं नकोस अशी." मीं अधिकच गंभीरपणें म्हणालों. तिचें हंसें पार मावळलें. तीहि एकदम गंभीर झाली. खुर्चीत व्यवस्थित बसून मीं बोलायला सुरुवात केली–

" सलू, तुम्हां बायकांना जगाचा अनुभव एकंदरींत कमीच ! तुला या भाव्यांच्या काकूंचे आणि स्वर्गवासी काकासाहेबांचे स्वभाव माहीत नाहींत. ते असते तर अशी त्यांना मदतीची भाषाच तूं वापरली नसतीस. माझं बालपण गरीबींत गेल्यामुळें जगाचे मला फार अनुभव आलेले आहेत. त्या वेळीं फ्रीशिप होती म्हणून मी शिकत होतों. मधुकरी मागून पोट जाळीत होतों. आणि श्रीमंत मुलांच्या जुन्या कपड्यांनीं देह भूषवीत होतों. अशी कशीतरी धडपड करीत मी मॅट्रिक गांठली. पुढें मॅट्रिक परीक्षेची मला पंधरा रुपये फी भरायची होती.

पंधरा रुपये !

इतके रुपये जन्मांत कधीं मीं एकत्र पाहिले नव्हते. एवढी फी भरायची कोठून आणि कशी ? काकासाहेब भावे हे त्या वेळीं बडे व्यापारी होते. माझी आई आणि काकू या बालपणच्या मैत्रिणी होत्या. आई हयात असतांना त्यांचें नेहमीं एकमेकींकडे जाणेंयेणें असे. लोक तर त्यांना सख्ख्या बहिणीच समजत. वडील तर अगदीं लहानपणींच गेले होते. पुढें माझ्या आईनें जगाचा निरोप घेतल्यावर त्यांचा व आमचा संबंध तुटल्यासारखा झाला. मैत्रिणीचा मुलगा म्हणून काकू मदत करतील अशी आशा धरून मी त्यांच्या घरीं गेलों. तांदूळ निवडीत त्या बसल्या होत्या. मोठ्या आस्थेवाईकपणानें त्यांनीं माझी विचारपूस केली.

" कितवींत गेला आहेस रे आतां तूं ! " त्यांनीं मला विचारलें.

" मॅट्रिकमध्यें. काकू, आमची येत्या एप्रिलांत परीक्षा आहे. फीकरितां पंधरा रुपये भरायचे आहेत मला. " मीं आशेनें काकूंकडे पाहिलें. खालीं पहात त्या तांदुळांतील खडे काढीत होत्या.

" हें पहा चिंतू, तूं म्हणतोस तें बरोबर आहे. पण आम्हांजवळ इतके कुठून रे असणार पैसे ? " तांदुळांतील उडीद बाजूला काढीत त्या माझ्याकडे पहात निर्विकारपणें म्हणाल्या.

त्यांच्या बोलण्याचा सूर बदलला. मी निराश झालों. गरीबांना मानापमानाचें कांहींच वाटत नाहीं. मी काकासाहेबांकडे जायचें ठरवून दुकानीं गेलों.

"काका, मॅट्रिक परीक्षेच्या फीकरितां पंधरा रुपये हवेत मला." केविलवाणा चेहरा करीत मी म्हणालों.

" हात्तेच्या ! परीक्षेला अन् पंधरा रुपये पाहिजेत? किती लागत असतील तितके देतो." ते हंसत म्हणाले. त्यांची व्यापारी बोली मला कशी कळावी ?

" पऽण... हें–पहा, चिंतूऽऽऽ ..."

" अंऽऽ... काय–काका ? " खडा लागल्यासारखें झालें मला.

"अरे शिकून शिकून काय करणार आहेस ? हो. एम्.ए-बी.ए.ला हल्लीं कोणी विचारत नाहीं. आत्तांच कुठं तरी नोकरी धर. चारपांच वर्षांत ४०–५० रुपये सहज मिळवायला लागशील." पानाचा बोकणा तोंडांत भरीत ते म्हणाले.

"पुढं पाहीन तें. पण, काका, तोंडचा घांस तरी घेऊं द्या कीं. पंधरा रुपये कांहीं फार नाहींत."

" काय, पंधरा रुपये फार नाहींत ? " पानांची पिचकारी मारून खों खों हंसत ते म्हणाले, " अरे, या पंधरा रुपयांत एक गुमास्ता गुरासारखा महिनाभर राबेल महिनाभर. तरीहि मी तुला नसते कां दिले पैसे? पण एकदां मॅट्रिक पास झाल्यावर बी. ए. पास व्हावंसं वाटतं. पुढं यमये. शिक्षण म्हणजे दारु आहे दारु. अगदीं एकच प्याला. हो, तरीहि दिले असते पैसे. पण हल्लीं बीए–एमएला कोणी विचारत नाहीं. "

तिथून काढता पाय घेतला मीं. पैसे मिळत नाहींत म्हणून मी फॉर्म भरायचा

नाहीं असें ठरविलें. साऱ्या मास्तर लोकांत हाहाःकार उडाला. मी शाळेची अब्रू होतों. शाळेला नांव मिळवायचें होतें. त्यांनीं वर्गणी जमवून माझा फॉर्म भरला. पुढें परीक्षेंत मी सगळ्या युनिव्हर्सिटींत सहावा आलों. जगन्नाथ शंकर शेठहि मलाच मिळाली. पुढं बक्षिसं, शिष्यवृत्त्या मिळवून स्वतःच्या पायावर कॉलेजशिक्षण घेतलं. वकिलीच्या परीक्षेंत मी पहिला आलों व म्हणून लवकर मला ही सब् जज्जाची नोकरी मिळाली. आतांपर्यंत कोठेंतरी दडून बसलेले माझे सारे आप्तेष्ट माझ्याभोंवतीं गोळा होऊं लागले. गूळ दिसला कीं मुंगळे हे जमायचेच. हांकलून दिले साऱ्यांना. हो, असल्या स्वार्थी जगाशीं संबंध तरी कां ठेवा ? मला वाटतं पुढं या काकासाहेबांना कापसाच्या सट्टयांत मोठीच ठोकर बसली आणि त्या धक्कयानंच त्यांचा अंत झाला. पाहतेच आहेस हल्लीं तूं कीं आतां त्यांच्याजवळ औषधालाहि पैसा नाहीं. स्वतःजवळ पैसा असतां लोकांच्या उपयोगी पडले नाहींत. मग आतां कां लोकांनीं त्यांना मदत करावी ? " मीं तिच्याकडे पाहिलें. अगदीं शांत झाल्यासारखी दिसत होती ती.

—" पण मी म्हणतें याचा त्या मुलाकडं काय दोष ? औषधावांचून तो मरतो आहे. त्याला वाचवणं चांगलं नाहीं कां ? श्रीमंतांच्या चुका तुम्हांला दिसतात आणि तुम्ही मात्र—"

—" तसल्यास चुका करतों ना ? " मी मध्येंच म्हणालों. "या जगांत दुसऱ्याला मदत करणं म्हणजे सर्पाला दूध पाजणं आहे. ज्यानं त्यानं स्वतः-पुरतं पहावं. "

" भाऱ्यांनाहि मग असं त्या वेळीं कशावरून वाटलं नसेल ? मग त्यांना तरी दोष देण्यांत काय अर्थ आहे ? "

" कोण देतोय त्यांना दोष ? " मी कुत्सिततेनें म्हणालों. ती चिडली.

" किती पाषाणहृदयी आहांत तुम्हीं ! " चिडून ती म्हणाली. मला राग आला.

" आजपासून या चळवळींना माझ्या घरांत बंदी आहे. " रागानें ताकीद देऊन मी उठलों.

वेळ झाल्यानें पोशाख केला आणि कोर्टांत गेलों. संध्याकाळीं परत घरीं

आलों. ती नेहमींप्रमाणें वर माडीवर खिडकीच्या तोंडाशीं दिसली नाहीं. सारा प्रकार मीं जाणला. तिच्याशीं न बोलण्याचाच मीं निश्चय केला. त्याशिवाय तिच्या चळवळी बंद पडणाऱ्या नव्हत्या. आचाऱ्याच्या हातून तिनें हौसेनें काढून घेतलेलें स्वैपाकाचें काम पुन्हां आचाऱ्याकडे गेलें. आम्ही घरांत मुक्यासारखीं वावरूं लागलों.

पांचसहा दिवस गेले. अजूनहि अबोला सुटला नव्हता. एके दिवशीं सहज मीं शिल्लक तपासली. दहा रुपये कमी भरले. लख्ख प्रकाश पडला डोक्यांत. मीं तिला रागांत हांक मारली. भीत भीत ती जवळ आली.

" यांतले पैसे काय झाले ? "

" काकूंना दिले. " ती शांतपणें म्हणाली.

" शरम नाहीं वाटत एकदां देऊं नको म्हटल्यावर पुनः द्यायला ? " मी रागानं लाल झालों होतों.

" मला कींव आली, मीं दिले. माझं जर पाषाणाचं हृदय असतं तर नसते दिले." ती शांतपणें सावकाश बोलत होती. मी खवळून गेलों.

" काय मी पाषाणहृदयी ? पण मी असा कां झालों याचा विचार नाहींस करीत ? याला कारण...कारण हे समाजांतले.. हे असले काकासाहेब-"

या वेळीं मी काय बोललों असतों सांगवत नाहीं. पण इतक्यांत जिन्यांत कोणाची तरी चाहूल लागून मी एकदम गप्प झालों. काकू आपल्या आजारांतून उठलेल्या मुलाला घेऊन जिन्याच्या पायऱ्या चढत होत्या. वर आल्यावर त्यांनीं मुलाला माझ्या पायांवर डोकें ठेवायला लावलें.

त्या मुलाचीं आजारानं नुसतीं हाडं राहिलेलीं होतीं. मला माझ्या बालपणच्या गरीबीची आठवण झाली. बालपणीं मीहि तसाच रोडका, गरीब, अनाथ नव्हतों का ? अशीं कितीतरी बालकं अन्नपाण्यावांचून आणि औषधावांचून या जगाला मुकत असतील ! कोण त्यांची विचारपूस करणार आहे ? मीं त्याच्या चेहेऱ्याकडे पाहिलें. डोळे खोल गेले होते. गालफडें बसलीं होतीं. नुसता पिवळा जर्द पडला होता त्याचा चेहरा. तें केंविलवाणें दृश्य पाहतांना माझ्या हृदयाला एकदम धक्का बसला.

"आजारांत कशाला आणलंत् काकू याला-"मीं खोल आवाजानं म्हटलं.

" आपल्या उपकारकर्त्यांचे आभार मानायला— " असं म्हणत काकूंनीं डोळ्यांत जमलेले अश्रू पुसले. " बाबूराव, क्षमा करा आम्हांला. श्रीमंतीचा धूर डोळ्यांवर असतांना दुसऱ्याचीं दुःखं आम्हांला दिसलीं नाहींत. तुमची कधीं त्या वेळीं आम्हीं विचारपूस केली नाहीं. तरीहि अपकार पोटांत घालून वर उपकारांनीं लाजविणारीं तुमच्यासारखीं देवमाणसं आहेत म्हणूनच हें जग चाललेलं आहे. "

मी ओशाळून गेलों होतों. खिशांत हात घालून मीं पांचाची नोट काढली. ती काकूंच्या हातावर ठेवीत म्हटलें, " काकू, आणखी कांहीं मदत लागल्यास कळवा बरं कां. "

मीं सलूकडे पाहिले. किती फुलला होता तिचा चेहरा !

" माझ्या बाळाचे तुम्ही देव आहां म्हणून बाळ वांचला, " असं कृतज्ञतेनें म्हणत मुलाला घेऊन काकू जिना उतरून गेल्या.

सलूची क्षमा मागायची ठरवून मीं वर पाहिलें. पण ती तिथं होती कुठं? स्वैंपाकघरांतून स्टोव्हची व भांड्यांची खडबड माझ्या कानांवर आली. स्वैंपाकघराचा चार्ज घेतला होता तिनें.

थोड्याच वेळांत ट्रेमध्यें चहाचे प्याले आणून तिनें माझ्यापुढें ठेवले.

" चहा आहे वाटतं ! " सुरुवातीला कांहींतरी बोलायचें म्हणून मी बोललों.

" अंऽहं, अमृत आहे. देव चहा पीत नसतात. " मानेला हिसडा देऊन ती हंसत म्हणाली.

" पण **आमच्यासारखे पाषाण तुम्हां भक्तामुळेंच देव होतात.** समजलीस? असल्या या विचित्र देवाला तूं काय म्हणशील ? " हंसतच मीं तिच्याकडे पाहत प्रश्न टाकला व चहांत साखर घालण्याकरितां ट्रेमधील साखरेच्या भांड्याकडे हात नेला.

" **पाषाणाचा देव !** " खट्याळपणें म्हणत विसरलेलं साखरेचं भांडं आणण्यासाठीं ती आंत पळाली.

———

## १२ शास्त्रज्ञाचें प्रेम

### श्री. मनोहर आळतेकर

नेहमींप्रमाणें १०॥ च्या सुमाराला 'बुधवारा'मधून भिडे मास्तर चालले होते. शाळा घरापासून अवघी पांच मिनिटांच्या वाटेवर! पण मास्तरांना दहा मिनिटें चालून झालीं तरी शाळेचा ठिकाणा नव्हता. शाळेचीं मुलें जर असतीं तर त्यांनीं आनंदानें उड्याच मारल्या असत्या; पण दुसऱ्या क्षणाला आश्चर्यानें म्हणालीं असतीं, "आज सुट्टी तर नाहींना आपल्याला? भिडे मास्तर आणि ह्या वेळेला बुधवारांत!" कारण भिडे मास्तरांची नियमित-पणाबद्दल होतीच तशी ख्याती! प्रत्येक मास्तराची अगदीं खडान्‌खडा माहिती असणाऱ्या मुलाला देखील भिडे कोणत्या दिवशीं गैरहजर होतें हें सांगावयाला दहावीस मिनिटें डोकेंच खाजवावें लागलें असतें. तो म्हणाला असता, "सायन्स शिकवावं तर भिडे मास्तरांनींच. काय पण मस्त शिकवतात!! आणि रिकाम्या वेळीं कृत्रिम पेट्रोल तयार करण्याकरितां प्रयोगहि चाललेले असतात म्हणे." पण असें असूनदेखील मास्तर 'बुधवार'-मधूनच चालले होते. कारण......

कारण त्यांच्या डोक्यांत कधी न आलेला, त्यांच्या दृष्टीनें विलक्षण पण दुसऱ्यांच्या दृष्टीनें साधाच विचार चालला होता.

मास्तरांच्या डोळ्यांसमोर सकाळचा प्रसंग मूर्तिमंत उभा होता. आणि तें बिषारी वाक्य देखील!

संवयीप्रमाणें मास्तर शास्त्रीय ताजी माहिती पुरवणारा अंक घेऊन सकाळचे प्रहरीं वाचत बसले होते. शास्त्र हा त्यांचा खास 'धंदेवाईक' व आवडता विषय असल्यामुळें साहजिकच त्यांची समाधीच लागली होती.

"ऐकलतं कां?" त्यांची बायको सुशीला कडाडली.

"काय? काय म्हणालीस तूं?" मास्तर भानावर येऊन म्हणाले. आपल्या शेजारीं बराच वेळ बायको उभी आहे हें लक्षांत आलें नाहीं त्यांच्या.

"आतां मात्र हद्द झाली बाई तुमच्यापुढें," रागामुळें सुशिलेच्या डोळ्यांत आसवें उभीं राहिलीं होतीं.

" अग ! पण झालं तरी काय तुला रडायला ? चांगली मॅट्रिकपर्यंत शिक्षण घेतलेली मुलगी आणि अशी रडतेस ? "

" आतां रडावयाचें नाहीं तर कां हंसावयाचें ? बोलणाऱ्याचें तोंड दिसतें पण ह्या तीन वर्षांत आपण होऊन कधीं माझ्याशीं बोललांत कांहीं ? आणि हल्लीं तर आपण हें पेट्रोलचें नवीनच खूळ डोक्यांत घेतलें आहे. बायकोशीं साधं नीटपणं बोलायला वेळ मिळत नसेल तर—तर लग्न तरी कशाला केलेंत बाई ? "

मास्तर नुसतेच हंसले आणि वाचूं लागले.

" आतां मी एकदां तुम्हांला विचारतें. तुम्ही आज ' ब्रम्हचारी'ला येणार आहांत कां नाहीं ?

" हें पहा तूं आणि दिनकर जा कशी. त्याचें कॉलेज लौकर सुटतें. आणि ज्यूनिअरमुळें वेळहि असतो भरपूर त्याला ! मला ह्या असल्या गोष्टी कधीच आवडत नाहींत. मी बरा कीं माझा विषय बरा ! "

" पण आपलं माणूस असलें म्हणजे बरें वाटतें मनाला. " सुशीला अजीजीच्या सुरांत म्हणाली.

"अग पण दिनकर आपलाच नाहीं का ? सख्खा भाऊ आहे माझा तो."

" पण—पण तुम्ही नाहीं का येणार ? "

" अं हं ! आज तर वेळ नाहीं बुवा !! "

आतां मात्र सुशिलेचा मनावरचा ताबा पुरता उडाला. ती म्हणाली, "अगदींच कसं हो तुम्हांला नाहीं समजत ? कळतं नाहीं म्हणावं तर शाळेमध्यें, कॉलेजमध्यें हुशार-हुशार म्हणून लौकिक ! नोबेल प्राइझ मिळवावीं ही आपल्या बुद्धिमत्तेची आकांक्षा ! पण खरें सांगू का तुम्हांला, पांच वर्षें जगांत काढलेल्या पोराला व्यवहार उमजतो तितका देखील समजत नाहीं तुम्हांला. माणसाशीं कसं वागावं, कसं बोलावं, ह्याची दखलच नाहीं आपल्याला ! जग नुसत्या बुद्धिमत्तेवर, शोधक बुद्धिमत्तेवर नाहीं चाललेलं. जगांत व्यवहार आहे, क्षणोक्षणांत उसळणाऱ्या मातृप्रेमासारख्या, राष्ट्रप्रेमासारख्या भावना आहेत. आणि हृदयाच्या आंतल्या गाभाऱ्यांत दडी देऊन बसलेल्या महाभयंकर वासनाहि आहेत. पुन्हां एकदां सांगतें तुम्हांला, **माणसाला भावना असतात, मन असतं आणि तें तर फारच चंचल असतं !** "

आणि हेंच वाक्य व हाच प्रसंग मास्तरांच्या डोळ्यांसमोर ढळढळीत उभा असल्यामुळें मास्तर वाट चुकत होते. तीन वर्षे झालीं. कधींदेखील अवाक्षरानेंहि न दुखवणारी सुशीला इतकी चिडली कां ?

एकाएकीं मास्तरांची दृष्टि आपल्या डाव्या बाजूला गेली. लकडी पुलावर आले होते ते. समोरच स्मशानांत भडकलेली चिता दिसत होती त्यांना. खरोखर आपल्या संसाराची देखील अशीच चिता नाहीं का भडकलेली ? सुशिलेचा शब्दाशब्दांतून, अक्षराअक्षरांमधून अशाच ज्वाळा उफाळत होत्या.

पण त्यांची कर्तव्यबुद्धि कांहीं झोंपली नव्हती.

" साहेब ! टांगा पाहिजे का ! " हा नेहमींचा सवाल ऐकून ती उसळी मारून म्हणाली, " हो—हो, पाहिजे मला टांगा ! ए. बी. स्कूलपाशीं जावयाचें आहे. "

" साहेब, सहा आणे पडतील. "

" पडले तर पडले," असें आपल्याशींच पुटपुटत मास्तर टांग्यांत बसले.

" वा ! भिडे मास्तर, तुम्हांला आणि उशीर ? मला वाटलं आज सूर्य पश्चिमेस उगवला आहे कीं काय ! "

" लागला झालं जरा उशीर ! थोडेंसें जरूरीचें काम होतें. " असें आंबट चेहऱ्यानें उत्तर देऊन मास्तर प्रयोगशाळेकडे सरकले.

सातवी इयत्तेचीं मुलें मास्तरांची वाटच बघत उभीं होतीं. त्यांच्यामधला एक हुशार असलेला गोरटेलासा मुलगा म्हणाला, " सर ! आम्हांला वाटलं तुम्ही येणारच नाहीं. पण आपली वाट बघितली झालं ! "

" असं का ? छान ! बरं आज कुठचा प्रयोग करावयाचा ? मीं लिहून दिलें आहे ना गेल्या वेळेला ?" भिडे मास्तर पांच मिनिटांपूर्वीचे सर्व विचार विसरले होते. कांहीं झालें तरी आवड आणि कर्तव्यबुद्धि ह्या संरक्षक देवता होत्या त्यांच्या ! आणि मुलांचें आपल्यावर प्रेम आहे, आपण चांगलें शिकवतों ह्याहि संमिश्र भावना मिसळल्या होत्या त्यांत !

" सर ! water boils at low temperature हा प्रयोग करावयाचा आहे आज. "

" हं, मग करा बघूं माझ्याभोंवतीं कोंडाळें, " मास्तर प्रयोगाचीं उपकरणें गोळा करीत म्हणाले.

" सर! पण तुकडीतुकडीला नाहीं का आज प्रयोग करावयाला?" सगळ्या मुलांची भावना त्या गोरटेल्या मुलाच्या तोंडामधून बोलत होती.

" अरे, उद्यांचा प्रयोग तुम्हांला सगळ्यांना करावयाला मिळेल! असं काय करतां?" मास्तर टेबलावर उपकरणें नीट मांडून व स्पिरिटचा दिवा पेटवून म्हणाले. मुलांनीं नाइलाजानें त्यांच्याभोंवतीं कोंडाळें केलें.

" इकडे लक्ष द्या बरें कां नीट! हें पहा, कांचेचें भांडें आहे. पाण्यानें अर्धवट भरलेलें आहे तें. आतां पाणी तापवितों, पण उकळेपर्यंत नाहीं बरें का!" मास्तर तें काचेचें भांडें दिव्यावर चिमट्यानें धरून बोलत होते. सर्व मुलें लक्षपूर्वक बघत होतीं त्यांच्याकडे. पाणी गरम झाल्याचें पाहून भिडे मास्तर म्हणाले, " आतां नीट द्यारे लक्ष. काळे, इकडे बघ बघूं! बोरें चिंचा मागाहून खा. अजुन हें पाणी उकळी फुटेपर्यंत कांहीं तापवलें नाहीं. तरी पण ह्या पाण्यांत उकळ्या फोडून दाखवितों. हें बूच! बूच बसवणार आहें भांड्यावर! बसवलें!! झाली कीं नाहीं उकळ्या यावयाला सुरुवात!" सर्व मुलें चकित नजरेनें त्या कांचेच्या भांड्याकडे पाहत होतीं. मधूनमधून पाण्यांत बुडबुडे फुलत होते व फुटत होते.

" आहा रे! बोलले कवि!! उगीच नाहीं करीत दोन वर्षें ' पंढरपूरच्या वाऱ्या '. बाळाच्या तोंडून काय निघेल कांहीं सांगतां येत नाहीं." एकाएकीं त्या हुशार गोरटेल्या मुलाचा आवाज सगळ्यांना ऐकूं आला.

मध्येंच एकाएकीं तल्लीनतेचा भंग झाल्यामुळें मास्तर थोडेसे कपाळीं आठ्या चढवूनच म्हणाले, " काय रे, कोण काय म्हणाले?"

" कांहीं नाहीं सर! मी तसें कांहींच बोललों नाहीं." कवि म्हणून टवाळी केला गेलेला मुलगा घाबरून म्हणाला.

" कांहीं नाहीं कसें? सर, तो म्हणत होता कीं, **पाण्याला जर एका विशिष्ट परिस्थितींत टाकलेंत तर त्याला उकळ्या फुटतात, मनुष्याची गत तशीच नाहीं कां?**

" म्हणजे? मला समजला नाहीं त्याचा अर्थ?" गोरटेल्या मुलाचें भाषण ऐकून मास्तर म्हणाले. थोडाफार आशय लक्षांत आल्यामुळें त्यांना तो पुरा समजून घेण्याची उत्सुकता लागली होती. ' कवी कवि ' म्हणून चिडविलेल्या मुलाकडे वळून ते म्हणाले, " तुला काय म्हणावयाचें होतें?"

मास्तरांनीं आपल्याला इतक्या उत्सुकतेनें विचारलेलें पाहून तो मुलगा उत्साहानें म्हणाला, " विशिष्ट परिस्थितींत टाकलें असतांना पाण्यासारख्या निर्जीव वस्तूलाहि उकळ्या फुटतात. मग भावना, बुद्धि आणि मन असणाऱ्या माणसांना असेंच वागविलें तर काय होईल ? समजा एखाद्याला गरीबीत टाकलेंत, कसल्याहि तऱ्हेचें सुख मिळूं नयेत अशी व्यवस्था केलीत, सहानभूति, दया, प्रेम असल्या सोज्ज्वल भावनांचा सहवासहि लाभूं दिला नाहींत त्याला तर काय होईल ? माणूस-जातीचा द्वेष्टा नाहीं का बनणार तो ? चोऱ्या, खून असे गुन्हेसुद्धां करील तो ! पण ह्या पापाचा धनी कोण? ती विशिष्ट परिस्थितीच नव्हे कां ? " अगदीं भरांत येऊन तो मुलगा बडबडत होता. ' कवीच आहे झालं लेकाचा ' अशा अर्थाच्या मुद्रा करून मुलें आपापसांत हसंत होतीं. पण मास्तर निर्जीव पुतळ्यासारखे ऐकत होते. त्यांच्या चेहऱ्यावरच्या विचाराच्या छटा क्षणाक्षणाला पालटत होत्या. बोलणें संपल्यामुळें मास्तर कांहींतरी बोलतील म्हणून तो मुलगा उभा होता. मास्तर तर हालचालहि करेनात. मुलांना देखील चमत्कारिकच वाटूं लागलें. घंटेचा टोला पडला व मास्तर भानावर आले. पण जसें कांहीं झालेंच नाहीं अशा मुद्रेनें म्हणाले, " जा ! आपण उद्या पुढचा प्रयोग करूं."

" आज झालें आहे तरी काय मास्तरांना ! सकाळीं एकतर आले उशिरा ! आणि आतांचें हें बोलणें ! ! कांहीं तरी आज विशेष घडलें असावें." असा विचार करीत मुलें बाहेर पडूं लागलीं. बोलणारा मुलगा तर बिचारा हिरमुसला चेहरा करून गेला.

सर्व मुलें निघून गेल्यावर मास्तर जड पावलांनीं प्रयोगशाळेंतच असलेल्या त्यांच्या खास खोलींत गेले. आणि दार लावून टेबलापाशीं असलेल्या खुर्चीवर धाडकन् अंग टाकून बसले. सकाळचा सगळा प्रसंग त्यांच्या डोळ्यांसमोर उभा राहिला. सुशिलेनें चिडून उच्चारलेलें तें वाक्य ! तें वाक्य तर घणाचे घाव घालूं लागलें त्यांच्या कानांवर ! सकाळच्या वाक्याचे शब्दन् शब्द डोळ्यांसमोर नाचूं लागले त्यांच्या !

**"माणसाला भावना असतात, मन असतं व तें फार चंचल असतं!"**

परत आपल्यासमोर सुशीला त्वेषानें, असहायपणें बोलते आहे कीं काय असें वाटून मास्तरांनीं आपलें तोंड हातांत दडवलें. सुशीलेचा सकाळच्या

बोलण्याचा पुरेपूर अर्थ त्या शास्त्रीय प्रयोगामुळें उमजला त्यांना. सुशीलेला ' **आपलं माणूस** ' पाहिजे होतं. त्याचा भाऊ नको होता. मास्तरांना अवघ्या जगाचा विसर पडला होता आता. ते बसलेली ती प्रयोगशाळा, सदैव चिवचिवणाऱ्या मुलांचें चिमणें जग, त्यांच्या बरोबरीचीं माणसें-अगदीं सगळ्या-सगळ्यांचा विसर पडला त्यांना. डोळे दुखतात म्हणून हेड-मास्तरांकडून सुट्टी घेऊन त्यांनीं घरचा मार्ग सुधारला.

कांहीं कारण नसतांना मधेंच घरीं आल्यामुळें सुशीलेनें विचारलें," आज इतक्या लवकर येणें झालें ?"

" तूं 'ब्रह्मचारी'ला जाऊं म्हणत होतीस ना ? म्हणून आलों !" आपलें मानसिक वादळ दडवीत मास्तर म्हणाले.

" इश्श ! पण सिनेमाचा शो तर ६-३० ला असतो कीं ! कांहींच्या बाहींच वागणं तुमचं ! "

" अग ! पण ' **आपलं माणूस** ' तर असतें ना ? मग झालं !" मास्तर हंसून म्हणाले.

आतां मात्र सुशीला विचारांत पडली. सकाळच्या व आतांच्या विचारांचा वागण्याचा तिला मेळच बसवितां येईना मुळीं. उगीच बोलून बसलेली घडी बिघडवा कां म्हणून ती आपली ' उगीच ' बसली.

पण संध्याकाळीं सिनेमा बघतांना मात्र सुशीला हळूंच मास्तरना म्हणाली, " खरं सांगायचं बरं का ? हा फरक कोणीं घडवला ?"

" अग ! शास्त्रीय प्रयोगानें " आणि मास्तरांनीं हलक्या आवाजांत सकाळची सगळी गंमत सांगितली.

" इश्श ! ज्याच्यामुळें आपण दुरावलों त्या **शास्त्रानेंच आपल्याला एकत्र आणलें म्हणायचें.** "

" कांट्यानेंच कांटा काढतात म्हटलं " मास्तर परत उत्तरले. आतां मात्र सुशीलेला हंसूं आवरेना ! पण मास्तरांची विनोदी वृत्ति येथेंच थबकणारी नव्हती. नायिका जेव्हां 'ब्रह्मचाऱ्या'च्या श्रीमुखांत भडकावते तेव्हां ते सुशीलेला म्हणाले, "सकाळीं तुला अशीच भडकवावीशी वाटली असेल नाहीं ? "

" इश्श !!" सुशीला तोंड वेंगाडून म्हणाली. पण त्या 'इश्श'मधलें **सौंदर्य त्यांना कोणत्याहि प्रयोगांत अनुभवावयास मिळालें नव्हतें.**

( सत्यकथा )

## १३ कर्जापायीं–!

श्री. राम अत्तरदे

" रामा ! गाडी उभी कर म्हणून सांगत्यें ना ? शेत लई दूर आहे, पाय दुखून आलेत माझे. "

" हें बघ, माझे बैल फारच गरम आहेत, ते थांबत नाहींत. अग, मी असतों तर धांवत धांवत उडी मारून बसलों असतों. तूं कां नाहीं करीत तसं ? अग, मार उडी ! भित्री भागुबाई नाहीं तर ! हं मार उडी. "

तिच्या सांवळ्या गालांवर सलज्ज स्मित चमकूं लागलें.

अखेरीस मीं गाडी उभी केली न् ती बसली. मी होतों गाडी हांकीत, ती पुनःपुनः किती वेळां मजकडे पाहते, तें मला मोजतां कसें येणार ? पण मी मागें पाहतांच तिला मात्र पूर्ण समजावयाचें.

पण कसेंहि झालें तरी मी पुरुष; स्त्रियांच्यासारखा चोरून बघण्यांत मी अट्टल कसा असणार !

नुकतीच पंधरा दिवसांपूर्वी घेतलेली नवीन गाडी, अगदीं नवी करकरीत. चाकांचीं आरीं न्, तसेंच कठड्याचे खुंटे, जूं, दांडे इत्यादिकांवर शेंदुराचे पट्टे ओढिले होते. अगदीं नखरेबाज बांक असलेल्या डौलदार ठेलाच्या शिंगांचे बैल असून त्यांच्या शिंगांना पितळी घुंगरांच्या शेंब्या होत्या, तोंडावर मोरखे असून गळ्यांत उत्तम घंट्या नि मण्यांचे पट्टे होते. माझ्या हातांत नवीनच असा रंगीत चाबूक होता, त्याला झकासपैकीं गोंडे लाविले होते.

सकाळच्या प्रहरींचा मन्दमन्द शीतल वारा वाहत होता. सूर्याच्या किरणांनीं सारीं शेतें हिरवींगार न् सोनेरी झांक पसरल्यासारखीं डोळ्यांत भरत होतीं.

भेंडीला सुरेख भेंडी आली होती. तुरीचीं बहीं वाऱ्यानें वांकून नाचत नाचत झुलत होतीं.

नीट पुढें तोंड करून मी गाडी हांकीत होतों, पण आतां जरा बाजूला वळून बसलों. तिची न् माझी दृष्टादृष्ट झाली. मीं स्मित केलें, त्या वेळीं तिनें खूप पदर ओढून तोंड झांकून घेतलें, पण तिच्याहि तोंडावर स्मित झळकल्यासारखें मला दिसलें.

तोंड झांकून घेतलें तरी मधूनमधून चोरून पाहणें अजिबात बंद पडलें होतें, असें नाहीं.

--" कस्तुरी ! लहानपणीं आपण एकत्र खेळत होतों, हें आठवतच असेल तुला ? कीं नाहीं ? किति बरं मजा असते लहानपणीं ! आपण भिरकुंडाचे बैल न् गाड्या करून खेळत असूं. आतां हे खरोखरीचे बैल आहेत नि गाडीहि आहे. मी आहें न् तूंहि पण आहेस. आपणांला या गाडीवर प्रेमाचे खेळ पूर्वीप्रमाणेंच शुद्ध मनानें नाहीं कां खेळतां येणार ? लाजूं नको न् रागहि येऊं देऊं नको. मी तुला शुद्ध मनानें विचारीत आहें, माझ्यावर तुझं प्रेम नाहीं का ? "

ती अधोमुखी झाली. पदर पूर्वीप्रमाणेंच पुढें ओढलेला होता. तिच्या मुखावरील छटा मला दिसत नव्हत्या. ती गाडीच्या कठड्याच्या कामठीला नखानें खरवडीत होती एवढेंच.

" कस्तुरी ! तुझा वास कुठं गेला पळून ? तूं बोलत कां नाहींस ? एका शब्दाचा भुकेलेला मी. तूं नांवाप्रमाणेंच कस्तुरी आहेस अशी माझी खात्री आहे. कस्तुरी ! कठोर शब्द कां असेना, एकदां बोल म्हणजे झालं ! ! "

तिनें हळूच चोरून पाहिलें. माझी चर्या त्या वेळीं अस्थिर होती. मघाचं हंस पळालें होतें. दोघांचा परिचय खूपच होता तरी असें झालें खरें. प्रेमयाचना करितांना असें होतेंच म्हणतात.

कर्पुळ ओढ्याचा रस्ता संपेपर्यंत कस्तुरी माझ्याशीं बोलली नाहीं, पण लवकरच तिला बोलावें लागलें. तिच्या बापाचें-रामजीबावांचें शेत जवळ आलें म्हणून तिला गाडीखालीं उतरणें भाग होतें. प्रथम मींच गाडी थांबवावी म्हणून तिनें थोडी हालचाल केली, पण मीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. शेतावरून गाडी पुढें जाणार तोंच निरुपायास्तव तिनें माझ्याकडे न पाहतां मला गाडी उभी करण्यास सांगितलें.

" कस्तुरी ! अशीच न बोलतां जाऊं नकोस. निदान नकार तरी दे; त्यांत मी समाधान मानीन. शेवटचा एकतरी शब्द मला ऐकूं दे. "

" काय सांगूं ? माझंच कपाळ फुटकं, रामा! तुझ्याशीं मी कधीं कठोर वागलें तरी का ? पण आज माझं कपाळ मला तुझ्याशीं बेइमान होण्यास भाग पाडीत आहे. मायबाप देतील त्या घरीं मुकाट्यानं जाणं हें आम्हां बायकांचं काम. त्याला मी तरी काय करूं ? कालच माझ्या बापाचा सावकार तो दिनाबा आला होता. मला मागणी घातली त्यानं. 'तुमची मुलगी द्याल तर सगळं दोन हजार कर्ज सूट देईन ' म्हणून त्यानं सांगितलं. माझ्या बापानं ' हो ' सांगितलं त्याला-मला त्या पन्नाशी उलटलेल्या सावकाराच्या गळ्यांत बांधण्याचं ठरवलं आहे. **कर्जापायीं** शेतकऱ्यांचीं गुरंढोरं सावकार ओढून नेतात, तीं मुकीं जनावरं बिचारीं !! पण आता हें **दोन पायांचं चालतंबोलतं जनावर सावकार ओढून नेणार ?** रामा !...रामा...! तुला किती न कसं सांगूं ? तुझ्यावर माझी किती प्रीति होती ! सावकाराच्या तिजोरींत मी जमा होणार !! तुला मी मुकणार!!! पण...पण...पण... मला क्षमा कर. माझ्या शरीरानं त्याच्या कर्जाची रक्कम फिटेल, पण शरीरापलीकडे त्याला अधिक काय मिळणार ? म्हणे, मुलगा नाहीं म्हणून ही पोर बायको हवी, रामा ! माझ्या शरीराची माती झालीच आतां. त्याचा नको लोभ धरूं. माया कधीं विसरतां कां येते ? आपली प्रीतीची कथा कधींकाळीं तरी आपण विसरूं का ? माझ्या जीवांत जीव आहे तोंवर मला तुझी आठवण राहील, तुझं चित्र मला नेहमीं डोळ्यां-समोर दिसेल. फार काय, प्रत्यक्ष मरतानांहि तुझं ध्यान करीत तुझ्या नांवानें-देवाच्या नव्हे-" राम ! " म्हणून मी प्राण सोडीन."

जणूं काय आणखी एक पळभर देखील थांबणें योग्य नाहीं, हें जाणून बैल आपोआप हळूच चालते होऊन थोडा वेळ थांबलेली गाडी पुन्हां चालूं लागली !

मी अस्वस्थ स्थितींत कठड्याच्या खुंट्यांना तिरपा टेकून बेचैन पडलों होतों ! माझ्या त्या वेळच्या अस्वस्थतेची मलाच जाणीव नव्हती-काय झालं असतं-अन् काय झालं— ? ? ?

माझंच काय ?-किती तरी वेळां असंच घडत असतं खेड्यांत ! ! !

# १४ वंचना

प्रो. माधव का. देशपांडे, एम्. ए.

दुसरी टर्म सुरू होऊन जवळ जवळ पंधरा दिवस उलटल्यानंतर ललिता जयवन्त ही कोणत्या तरी कॉलेजांतून आमच्या कॉलेजमध्यें आली व तिनें इंटर आर्टस्‌मध्यें नांव घातलें. अगदीं पहिल्या दिवशींच त्या सुंदर मुलीनें सफाईदार पद्धतीनें वर्गांत प्रवेश करतांच मुलेंच काय, पण आम्ही मुलीहि चमकून गेलों आणि अगदीं सहजच आमच्या चौकस नजरा एकमेकींच्या नजरेला भिडल्या. जणूं काय आम्ही एकमेकींना सुचवीत होतों--

" किती चलाख व तेजस्वी मुलगी आहे, नाहीं? कसे सुंदर पाणीदार डोळे आहेत! आणि तिचं ते निळसर पातळ! कसं शोभून दिसतं नाहीं तिच्या त्या गौर वर्णाला? "

आठवड्या दोन आठवड्यांतच ती सर्वत्र कौतुकाचा आणि चर्चेचा विषय होऊन बसली. प्रत्येक खेळांत उत्साहानें भाग घेऊन तिनें सर्वांना चकित करून सोडलें. टेनिस, बॅडमिंटन, पिंगपाँग, रिंग-टेनिस इत्यादि सर्व खेळ ती खेळे व तिचा सकाळ-संध्याकाळचा जवळ जवळ सर्व वेळ खेळण्यांत जाई. इतकेंहि करून तिच्या दांडग्या उत्साहाला आणखी मुक्तद्वार म्हणून कीं काय तिनें कॉलेज पार्लमेंटमध्यें प्रवेश करून घेतला. डिबेटिंग सोसायटीच्या तर्फे एका महिन्यांत जवळ जवळ तीनचार वेळां बोलून त्या मरणोन्मुख संस्थेंत तिनें जिवंतपणा आणला. कॉलेजांत अथवा बाहेर शहरांत कुणाहि प्रसिद्ध व्यक्तीचें व्याख्यान असो, सदैव आनंदानें व उल्हासानें तळपणारी ललिता तेथें हटकून हजर असावयाची. इतकेंच नव्हे, तर तिच्या या उत्साहातिरेकाबद्दल कधींकधीं विद्यार्थ्यांत गंमतीची चेष्टा चाले. हातांत कसलें तरी नोटबुक घेऊन ललितेची चपल मूर्ति लगबगीनें वर्गाकडे अगर लायब्ररीकडे जातांना दिसली कीं एखाद्या वात्रटानें विचारावें,

" काय रे बाब्या, आज नेहरूंचं गांवांत व्याख्यान आहे म्हणे! पण खरंच का पंडितजी हजर राहणार आहेत? "

त्यावर उगाचच मोठ्या आवाजांत 'बाळ्या' कडून उत्तर येई,

"नेहरू येणार किंवा नाहीं तें नाहीं आपल्याला सांगतां यायचं? पण..."

आणि किंचित् खांकरून पुढें वाक्य पूर्ण होई,

"एक माणूस हजर राहणार हें मात्र नक्की, बरं का, भाऊराव!"

आणि मग खूष होऊन टाळी दिली जाई व एकदम हंसण्याचा खदखदाट होई!

याप्रमाणें अनंत व्यवसायांत गर्क असणाऱ्या या मुलीबद्दल रेसिडेन्सींतील आम्हां मुलींना पराकाष्ठेचें कुतूहल वाटे व हिला इतक्या गोष्टी जमतात तरी कशा याचा विस्मय वाटत असे.

एके दिवशीं अगदीं उजाडतांच घाईघाईनें टेनिसची रॅकेट घेऊन ती खोलींतून बाहेर पडतां पडतां तिला गांठून मीं म्हटलें,

"ललिते, इतके उद्योग करून तूं दमत कशी नाहींस बाई? सदा पहावं तों कसल्या ना कसल्या गडबडींत दंग असतेस! म्हणावं तरी काय बाई तुला!"

त्यावर खुदकन मधुरपणें हंसून—ती अशी खुदकन हंसली म्हणजे कशी गमतीदार दिसे!— वेणीच्या शेपट्याचें टोंक रॅकेटच्या मानेभोंवतीं गुंडाळींत ती म्हणाली,

"मौज वाटते ग फार, मीने, असं एकसारखं कसल्या तरी धडपडाटांत गर्क असलं म्हणजे! तुला नाहीं आवडत असं ॲक्टिव्ह लाइफ?" आणि एकदम गंभीर होऊन खिन्न स्वरांत ती पुढें बोलली,

"तेवढाच मनाला विरंगुळा वाटतो! बरं असतं मनाला कसला तरी व्यवसाय लावून घेतला म्हणजे!"

इतकें बोलून चटकन् हातांतील रिस्टवॉचकडे पहात,

"अगबाई, सात वाजले कीं!"

असें आश्चर्यव्यंजक स्वरांत म्हणत ती तेथून निसटली; पण पुन्हां परत क्षणभरानें ती खोलींत आली व त्यानंतर सबंध दिवस ती खोलींतून बाहेर आली नाहीं.

अलीकडे आम्हांला तिच्या या विचित्र वर्तनाचें गूढ वाटूं लागलें होतें. सदैव आनंदानें चमचमणारी ही हंसरी द्वारका केव्हां एकाएकीं खिन्नपणें

बसून, वेड्यासारखी सर्व व्यवसाय सोडून आळशासारखी नुसती विचारांत गर्क होऊन वेळ काढील त्याचा नेम नसे. नेहमीं मुलींचा घोळका जमवून वितंडवाद करणारी ती पहिल्या नंबरची वावदूक मुलगी;पण लहर फिरली म्हणजे दोन दोन दिवस मौन स्वीकारून स्वतःला खोलींत कोंडून घेई! किंवा एकटीच फिरायला काय जाईल, नाहींतर भ्रमिष्टासारखी कॉलेजच्या आवारांत कसल्या तरी गूढ चिंतेंत मग्न असल्यासारखी नुसती भटकतच काय राहील! एक ना दोन!

एक गोष्ट मात्र खचित! तिचा नाजूक सडपातळ देह सर्व मुलींच्या कौतुकाचा व प्रशंसेचा विषय असे! ती स्वभावतःच हंसतमुख होती व त्यामुळें ती प्रसन्नवदना मुलगी सर्वजणींना हवीहवीशीच वाटे. इतकेंच नव्हे, तर ती खिन्न होऊन अबोल स्थितींत बसली असली तरी तिचें लावण्य कांहीं निराळ्याच कान्तीनें जणूं चमके! मला तिचे सुंदर टपोरे डोळे फार आवडत. त्यांत चमकणारी मार्दवतेची लकाकी पाहून मी तिला कधींकधीं चेष्टेनें म्हणे,

"ललिते, कसले ग जादूचे डोळे देवानं तुला दिले आहेत बाई! आम्हां मुलींना जर तुझ्या डोळ्यांचा इतका मोह पडतो, तर बाईसाहेब, आपण किती शाहण्या तरुणांना वेड लावायचं ठरविलं आहे! मोठी भीति वाटते बाई तुझी मला!"

–त्यावर गमतीनें हंसत तिनें म्हणावें, "पुरे झालं बाई तुझं पुराण! तुला सदान् कदा माझ्या रूपाशिवाय दुसरा विषयच नाहीं!"

एके दिवशीं आम्हीं सर्व मुलींनीं 'सॉंग ऑफ् सॉंग्स' या उत्कृष्ट चित्रपटाला जावयाचें ठरविलें. त्याप्रमाणें आम्ही सर्वजणी तयार होऊन ललितेला बोलवायला गेलों. त्या वेळीं ती शून्य नजरेनें खिडकींत टेकडीच्या बाजूकडे पहात होती. आम्ही दाराशीं येऊन 'टिच' करतांच तिनें दचकून आमच्याकडे वळून पाहिलें आणि आमचा बेत कळतांच चेहऱ्यावर हास्य आणून ती म्हणाली,

"हें पहा मला किनई आज सिनेमाला यायची लहर लागत नाहीं. तेव्हां कृपा करून—"

"पण कां?" आम्ही विचारलें.

" कारण सांगितलं तर हंसणार नाहीं याचं वचन द्या, म्हणजे सांगतें. नाहीं ना हंसणार ? "

" नाहीं हो, बाईसाहेब, नाहीं हंसणार ! हं आतां सांगा पाहूं तुमचं कारण ! "

त्यावर प्रथम नेहमींच्या पद्धतीप्रमाणें खुदकन् हंसून सर्वांकडे मोहक-पणानें ती पहात म्हणाली,

" आज सकाळीं मला माझ्या वसंतदादाचं इतकं सुंदर पत्र आलं आहे, कीं तें कितीहि वेळां वाचलं तरी मनाचं समाधानच होत नाहीं. म्हणून तें पत्र खिशांत घालून मी एकसारखी फिरतें आहें. बऱ्याच दिवसांनीं वसं-तानं इतकं मोठं व मौजेचं पत्र पाठविलं आहे, कीं आनंदानं मी जवळ-जवळ वेडीच झालें आहें म्हणानात ! "

त्यावर एकदम मध्येंच कमलनें म्हटलें,

" अगबाई ! खरं कां ? तरीच म्हटलं-ही अशी वेड लागल्यासारखी कां करते आहे ? चला ग बाई लवकर !—आपणच आपल्या जाऊं. ही नको वेडी आपल्याबरोबर. " त्याबरोबर एकदम हास्यकल्लोळ उडाला व ललिताहि मनमोकळेपणें हसत सुटली.

क्षणभरानें ती म्हणाली,

" म्हणून म्हणतें, कीं मी आज इतकी आनंदांत आहें, कीं मला सिनेमाला जावंसंच वाटत नाहीं. तेव्हां कृपा करून मला आजच्या कार्य-क्रमांतून वगळा. "

असें म्हणून सर्वांकडे तिनें बघितलें व पोलक्याच्या खिशांतून पत्र काढून तिनें आम्हांला तें दाखविलें.

त्यावर कमलनें तिला विचारलें,

"पण इतका हर्षवायु होण्याइतकं त्या पत्रांत असं आहे तरी काय ? कां कांहीं नाजुक बाबी आहेत आम्हांला न सांगतां येण्यासारख्या ?— "

त्यावर आपले सुंदर डोळे आमच्यावर रोंखून लटक्या रागानें ती म्हणाली,

"असं काय ग बोलतां ? मी तुमच्यापासून एकतरी गोष्ट लपवून ठेवतें कां ? सांगतेंच तुम्हांला कां मी इतकी आनंदी आहें आज तें ? आणि

मग तुम्हीच म्हणाल, ‘ हा वेडे, आमच्या भावाकडून जर आम्हांला असली आनंदाची बातमी कळती तर आम्ही हर्षानं नाचत सुटलों असतों ! ’ ”

असें म्हणून ती हंसली. त्यावर किंचित् चिडून रुष्ट स्वरांत कमलनें म्हटलें,

“ पुरे कर बाई हें तुझं चऱ्हाट ! आणि मेलीला हंसतांहि बरं येतं मोठं नाजुक अन्–”

पण तिचें तें वाक्य हास्यकल्लोळांत बुडून गेलें. हास्याचा लोट ओसरतांच मीं म्हटलें,

“ हं ! सांगून टाक पाहूं चटकन् काय तुझा वसंतदादा म्हणतो तें. ”

त्यावर गमतीदार हास्य करीत लाडिक स्वरांत ती म्हणाली,

“ आमच्या किनई वसंतदादाचं लग्न ठरलं आहे. आणि त्यानं बायकोहि मोठी सुंदर निवडून काढली आहे. डॉ. प्रभावळकरांची दुसरी मुलगी रोहिणी ! मॅट्रिकच्या वर्गामध्यें आहे. गातेहि सुंदर. दिलरुबाहि बरा वाजवते! टेनिस खेळते. हो ! किती गोड-गोड आहे माझी भावी वहिनी.”

त्यावर तिची चेष्टा करण्यासाठी सर्वजणींनीं एकदम हल्ला करून म्हटलें,

“ हाऽ ऽ ऽ त्तीच्या ! एवढंच कां लिहिलंय त्या पत्रांत ? आम्हांला वाटलं तुझं लग्न जमल्याचं त्यांत कळवलंय म्हणून ! आणि त्यांत तुझ्या भावी यजमानांचं सुरस वर्णन लिहून धाडलंय–म्हणून ही अशी कळी खुललीय–सुंदर, गोरागोमटा, बड्या पगाराचा, प्रेमळ, विद्वान्, बोलका . . . ”

त्यावर तिनें आपले सुकुमार हात पुढें करून ‘ पुरे पुरे ’ अशा तऱ्हेचा आविर्भाव केला आणि किंचित् चिडल्यासारखें केलें. तेव्हां आम्ही सर्वजणी मनःपूर्वक खो: खोः करून हंसलों आणि सिनेमाला निघून गेलों.

रात्रीं साडेबारा-एकच्या सुमारास आम्ही सिनेमाहून परत आलों. ललितेच्या खोलींत दिवा जळत होता. तेव्हां ती अजून झोंपली नाहीं हें पाहून आम्हांला बरेंच आश्चर्य वाटलें ! जिना चढून आम्ही वर आलों.

ललितेच्या खोलीवरून जाऊं लागलों तों आंतून हुंदक्यांचा आवाज आल्याचा भास आम्हांला झाला. ललितेच्या दारावर टिचकी वाजवून कमला ओरडली, “ ललिता, ए ललिते ! अजून झोंपली नाहींस वाटतं ?” त्यावर आंतून तिचें उत्तर आलें,

" नाहीं ग ! वसंतदादाच्या पत्राला उत्तर लिहीत बसलें होतें त्यामुळं वेळ झाला. आताच पत्र पुरं केलं ! बरं ! आतां जाऊन झोंपा पाहूं. मी अगदीं गळून गेलें आहे ! "

यानंतर बिछान्यावर धप्कन् अंग टाकल्याचा आवाज आमच्या कानीं आला. एकमेकींकडे चमत्कारिक नजरेनें पहात आम्ही मुकाट्यानें आमच्या खोल्यांकडे वळलों. सकाळीं सातसाडेसातला ललिता स्नानासाठीं खोलीच्या बाहेर आली. त्या वेळीं रडूनरडून डोळे सुजावे त्याप्रमाणें तांबडेलाल डोळे पाहून आम्ही विस्मयचकित झालों.

यानंतर दोन दिवसांनीं ती कुठेंतरी आपल्या मावशीला भेटण्यासाठीं गेली, ती चारपांच दिवसांनीं परत आली. पण त्या अवधींत तिच्या वडिलां-कडून सुंदर कलमी आंब्यांचें एक पार्सल येऊन पडलें होतें. ललिता येतांच आम्ही तिजभोंवती हलकल्लोळ करून तें पार्सल फोडविलें आणि दहा मिनिटांच्या आंत त्याचा फडशा उडविला. पार्सलबरोबर पाठविलेल्या पत्रांत वडिलांनीं म्हटलें होतें,

" पुढच्या आठवड्यांत मी व वसंत कोर्टाच्या कामासाठीं तिकडे येणार आहोंत, त्या वेळीं आम्ही रेसिडेन्सीवर तुला भेटायला येऊं. बुधवारीं संध्याकाळीं पांचच्या सुमारास खोलीवर असावें."

बुधवार उजाडला. त्या दिवशीं वडिलांची गांठ पडणार म्हणून ललिता अत्यानंदानें नुसती नाचत तळपत होती. ललितेचे वडील व भाऊ कसे आहेत हें पाहण्याची आम्हांलाहि उत्सुकता होती. तिच्याप्रमाणें तिचा भाऊ सुरेख, देखणा आहे किंवा नाहीं हेंहि जाणण्याची आम्हांला जिज्ञासा होती आणि म्हणून पांचच्या सुमारास आम्ही सातआठ जणी ललितेइतक्याच उत्सुकतेनें त्यांची वाट पहात बसलों.

पण पांच वाजून गेले तरी ललितेचे वडील व भाऊ यांचा पत्ता नव्हता. साडेपांच सहापर्यंत आम्हीं त्यांची वाट बघितली, पण त्यांच्या येण्याचें चिन्ह दिसेना. ललितेचा हिरमोड झाला. ती अतिशय खिन्न व उदास झाली व रोहिणीसारख्या सद्गुणी मुलीचें मन जिंकणाऱ्या वसंतदादाला बघतां आलें नाहीं म्हणून आम्ही बऱ्याच नाराज झालों.

त्याच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशीं ललितेच्या वडिलांचें पत्र आलें.

येण्याचा बेत कां रहित करावा लागला त्याचा खुलासा त्यांत त्यांनीं केला होता. सरतेशेवटीं त्यांनीं प्रेमळपणानें लिहिलें होतें,

" तुमच्यासारख्या सुंदर माणसासाठीं एक अनुरूप माणूस मिळवण्याची गोड खटपट आम्ही करीत आहोंत, म्हणून आम्हांला आमचा बेत रहित करावा लागला याबद्दल रागावूं नये बरं! लवकरच आम्ही तुम्हांला इकडे बोलवणार आहोंत. अभ्यास फार करूं नये!—नाहींतर निस्तेज माणसाला कोण पसंत करणार?"

वसंतदादाच्या पत्रांत त्यानें वात्रटपणें लिहिलें होतें,

" काय ग ललिते! बाबांनीं तुझ्या लग्नाची खटपट चालविली म्हणून तूं हुरळून गेली असशील नाहीं? पण त्यांनीं तुझ्यासाठीं एक अजागळ कोळशांतलं माणिक अचूक निवडून काढलं आहे त्याची वाट काय? आपल्याला तर बुवा तें बावळट ध्यान पाहून ओकारी आली! कशी ग संसार करणार तूं या प्राण्याबरोबर?"

पण जणूं काय या वर्णनावर विश्वास ठेवून ललिता जिवाचें रान करून घेईल या भीतीनें कीं काय, एक ताजा कलम जोडून म्हटलें होतें,

" वेडे! वर लिहिलेलं सगळं खरं मानून उगाच रडतबिडत बसशील बरं का खुळ्यासारखी! मीं किनई आमच्या सुंदर ताईसाहेबांची चेष्टा केली. मात्र तुला अनुरूप असा 'मॅन्' शोधतां शोधतां आज पंधरा दिवस टेनिसचं नांव नाहीं! पण इतक्या स्वार्थत्यागानंतर कां होईना आमच्या परिश्रमांचं चीज होईल अशीं चिन्हं दिसूं लागलीं आहेत. विशेष म्हणजे त्या सद्गृहस्थांनीं तुला बऱ्याच वेळां पाहिलं आहे असं कळलं! कमाल आहे बुवा त्यांची—आणि तुझीहि! कुठं ग पाहिलं त्यांनीं तुला! लबाड नाहींतर! त्या 'चिरंजिवांचं' नांव अजून तुला कळविलं नाहीं म्हणून तूं तडफडत असशील नाहीं? पण थांब, अशी अधीर होऊन जीव टाकूं नकोस! जरा गोष्टी जुळतांच 'बेफाम' फोटोच पाठवून देतों; आणि मग बघतों तुझा सौंदर्याबद्दलचा अभिमान कितपत टिकतो तें! आणि हें बघ! तो फोटो किनई त्या तुझ्या रेसिडेन्सींतील नकऱ्या पोरींना दाखव म्हणजे त्यांचाहि जरा नक्षा उतरेल!"

वसंताच्या पत्रानें आमची करमणूक झाली, तसेंच शेवटचा दिलेला टोमणा हि आम्हांला झोंबल्याशिवाय राहिला नाहीं!

असो. यानंतरचे पंधरा एक दिवस ललितेच्या यजमानांबद्दल चित्रविचित्र तर्क लढविण्यांत फारच मौजेचे गेले.

पंधरावीस दिवसांनंतर ललितेच्या वडिलांचें एक चिमुकलेंच पत्र आलें. पण त्यानें आनंदाचा केवढा कल्लोळ उसळला त्या दिवशीं रेसिडेन्सींत! त्या पत्रांत ललितेच्या विवाहविषयक वाटाघाटी यशस्वी झाल्याचा शुभ मजकूर होता व वसंताचें सविस्तर पत्र एकदोन दिवसांत येईल असें कळविलें होतें.

ती आनंदाची शुभ वार्ता कळतांच ललितेवर अभिनंदनांचा नुसता पाऊस पडला व प्रत्येकीला तोंड देतां देतां ती अगदीं जिकिरीला आली. तदनंतर वसंताचें भलें मोठें पत्र आलें; त्यांत ललितेच्या भावी यजमानांचें मोठें सुरस काव्यमय वर्णन लिहिलें होतें.

त्यांतील एक वात्रट वाक्य—"त्यांचें 'प्रोफाइल' अगदीं जॉन बॅरिमूर-सारखें दिसतें, समजलीस का ताई!" सर्वांना ठाऊक झालें व दुसऱ्या दिवशीं सकाळीं आम्ही चहा संपवून गॅलरींत आलों तों रात्रींच्या रात्रीं कुणीतरी तांबड्या निळ्या खडूनें ललितेच्या दारावर 'मिसेस जॉन बॅरिमूर!' अशीं ठळक अक्षरें लिहिलेलीं आमच्या दृष्टीस पडलीं! मग काय! हंसतां हंसतां अगदीं जीव जायची पाळी आली!

कोणाला वसंताच्या वर्णनशैलीचें कौतुक वाटलें, तर कोणाला ललितेच्या व वसंताच्या हस्ताक्षरांतील साम्याचें आश्चर्य वाटलें.

कमलनें म्हटलें देखील—

"ललिता, तुझ्या हस्ताक्षरांत व तुझ्या भावाच्या लिहिण्यांत किती विलक्षण साम्य आहे, नाहीं? यावरून तो तुझ्यासारखाच देखणा आहे असा जर तर्क काढला तर तो चुकीचा होणार नाहीं ना?"

त्यावर ललितेनें नाजुकपणें हंसून म्हटलें,

"माझा वसंतदादा माझ्यापेक्षां कितीतरी पटीनं सुंदर आहे! त्याचे काळे कुरळे केंस, सुंदर डोळे, धनुष्याकृति भुंवया, नेहमीं हंसरा चेहरा—"

पण तिला पुढें बोलूं न देतां मीं म्हटलें,

" हें काय ! म्हणजे तूं हुबेहुब तुझंच वर्णन करूं लागलीस कीं ! असो. विलायतेस जाऊन बी. ए. ( ऑक्सफर्ड ) होऊन आलेला फक्कड नवरा तूं मिळविलास याबद्दल मी तुझं मनःपूर्वक अभिनंदन करतें ! पण त्यांचा फोटो मात्र आम्हांला जरूर दाखव हं ! "

यानंतर आम्हीं ललितेच्या यजमानांच्या फोटोची उत्सुकतेनें वाट पाहूं लागलों. दरम्यान ललिता वडिलांच्या पत्राबरहुकूम चार दिवसांसाठीं म्हणून जी गेली ती जवळजवळ आठदहा दिवसांनीं परत आली !

—पण ती कोणत्या स्थितींत ?

प्रवासानें तिचा चेहरा उतरलेला दिसत होता. पण टांग्यांतून उतरतांच तिला थंडीची हुडहुडी भरली आणि खोलींत पाय टाकतांच तिला सणसणून ताप भरला !

रात्रीं तर ती वेड्यासारखी बरळूं लागली व जेव्हां सकाळीं तिचा ताप किंचित् उतरला तेव्हां कुठें आमचा जीव खालीं पडला. दुपारीं पुन्हां सडकून ताप भरला व तिचें सुंदर मुखकमल लालभडक होऊन गेलें. तापानें फणफणलेल्या स्थितींतच कमलनें विचारलेल्या तिच्या यजमानाबद्दलच्या प्रश्नाला तिनें क्षीणपणें सांगितलें कीं, परवां वसंतबरोबर तिचे भावी पति मोटरमधून फिरावयास गेले असतांना मोटरला अपघात झाला व त्यांत तिच्या भावी यजमानांना मानेजवळ मार बसून ते हॉस्पिटलमध्यें पडून आहेत !

नको नको म्हणत असतांना केवळ अभ्यास बुडेल म्हणून वडिलांच्या सांगण्यावरून ती परत आली होती.

ती शोकजनक हकीकत ऐकून आमचे डोळे पाण्यानें भरून आले !

यानंतर ललितेच्या वडिलांकडून जीं पत्रें येत त्यांत भावी जांवयाच्या प्रकृतीबद्दल अतिशय चिंताजनक मजकूर येई. मध्यंतरीं धीर राहीना म्हणून ताप असलेल्याच स्थितींत ललिता एकदोनदां तिकडे जाऊनहि आली. बरेच दिवस झाले तरी त्यांच्या मानेची सूज ओसरेना म्हणून 'क्ष' किरणांच्या साहाय्यानें त्या भागाची तपासणी करतांच गळ्याचें हाड पिचून गेल्याचें दिसून आलें. त्यामुळें दुखणें फार दिवस लांबणार अशीं चिन्हें स्पष्ट दिसत होतीं. इतकेंच नव्हे, तर दुखण्यांतून ते केव्हां उठतील याची डॉक्टरांना खात्री देतां येईना.

एके दिवशीं वसंतचें भयंकर मजकुराचें पत्र आलें. त्यांत त्यानें लिहिलें होतें,

" ललितातार्ई ! भाईसाहेबांचें दुखणें वाढत्या प्रमाणावर आहे ! आणि डॉक्टर म्हणतात—कसें सांगूं तुला मी तें !—कीं भाईसाहेब जरी सातआठ महिन्यांनी बरे झाले तरी त्यांची मान कायमची वांकडी राहील. ताई, किती प्रेमळ आणि उमदा स्वभाव भाईसाहेबांचा ! अरेरे ! माझ्या ताईवर काय हा विलक्षण प्रसंग ! ललिते, तुझें सांत्वन कसें करूं ?"

तें पत्र वाचतांच सर्वांचीं अंतःकरणें भरून आलीं, व जवळजवळ अर्धा दिवस रेसिडेन्सींतील मुलींच्या डोळ्यांचें पाणी खळलें नाहीं !

तेव्हांपासून ललितेच्या मनाला जो जबरदस्त धक्का बसला, त्यामुळें तिनें एकदम अंथरूणच धरलें ! आठदहा दिवस झाले तरी ताप उतरेना. ती झपाट्यानें खंगत जाऊं लागली. तिची प्रकृति अशी ढांसळलेली पाहून आम्ही घाबरून गेलों व प्रिन्सिपॉलना भेटून त्यांच्या संमतीनें ललितेची ससून हॉस्पिटलमध्यें एका स्वतंत्र वॉर्डमध्यें रवानगी केली.

हॉस्पिटलमध्यें ललितेवर उत्कृष्ट तऱ्हेचे उपचार चालू होते; पण त्यांचा तिजवर कांहीं परिणाम दिसेना आणि दिवसेंदिवस ती निस्तेज व अशक्त दिसूं लागली. तिच्या वडिलांना तीनचार तारा केल्या; पण त्यांचें उत्तरहि आलें नाहीं व तेहि आले नाहींत. आम्हांला मोठा विस्मय वाटला.

गोंधळून जाऊन आम्ही वसंतदादालाहि कळलेल्या पत्त्यावर चारपांच तारा केल्या ! पण त्याहि फुकट गेल्या !

अगदीं वेड्यासारखी स्थिति झाली आमची !

ललितेच्या घरची मंडळी आहेत तरी कोठें आणि त्यांचा शोध कसा लावावयाचा याचें आम्हांला कोडें पडलें !

ललितेला विचारावें तों ती नुसते हुंदके देऊन रडे व कोणता तरी पत्ता सांगे !

आतां 'करावें तरी काय' असा प्रश्न आम्हांला पडला. मोठें गूढ कोडें पडावें अशी चमत्कारिक गोंधळाची आमची स्थिति झाली.

पण तें कोडें स्वतः ललितेनेंच एके दिवशीं मोठ्या विस्मयकारक रीतीनें सोडविलें.

त्या दिवशीं शनिवार असल्यामुळें सकाळचें कॉलेज होतें. त्याचा फायदा घेऊन आम्ही दुपारीं दहाबारा जणी ललितेला भेटण्यासाठीं हॉस्पिटलमध्यें आलों. ललितेचा निस्तेज, करुण चेहरा दिसतांच आम्हांला भडभडून आलें. उठून बसतां येईना इतकी ललिता विलक्षण अशक्त झाली होती.

आम्ही तिजभोंवतीं बसलों असतांना खोल भेसूर आवाजांत तिनें बोलावयास सुरुवात केली. पूर्वीचा तिचा मंजुळ, श्रुतिमधुर आवाज जाऊन आतां म्हातारा जर्जर स्वर तेथें आला होता, व त्यामुळें आम्हांला पराकाष्ठेचें वाईट वाटलें. ललिता बोलत होती,

" मला आज तुमची सर्वजणींची क्षमा मागायची आहे व ती मागितल्याशिवाय माझं अंत:करण मोकळं होणार नाहीं !"

आम्हां सर्वांना तिच्या बोलण्याचा मोठा विस्मय वाटला आणि आश्चर्यव्यंजक नजरेनें आम्ही एकमेकींकडे बघत होतों, तोंच ललिता पुढें बोलूं लागली—

" मीं आज कित्येक महिने तुमची वंचना केली व खोट्यानाट्या गोष्टींचें नाटक तुमच्यापुढं उभं केलं. पण त्याला मी तरी काय करूं ? माझ्या एकलकोंड्या जीवनामुळं मलाहि विचित्र मार्ग पत्करावा लागला ! तुम्हांला मी मोठी हौशी आनंदी मुलगी वाटत असें, पण माझ्यासारखी दुर्दैवी मुलगी या भूतलावर नसेल !"

ललितेला काय म्हणावयाचें आहे तेंच आम्हांला कळेना !

कसली वंचना ?

कसलें नाटक ?

ललितेचें जीवन एकलकोंडें ?

पण या प्रश्नावलीचें उत्तर मागण्यापूर्वींच ललिता पाण्याचा घोट घेऊन पुढें बोलूं लागली,

" माझ्याइतकं निष्प्रेम, रूक्ष आयुष्य कुणीहि कंठलं नसेल. आईचं प्रेम कसं असतं याची मला कल्पना नाहीं ! वडिलांच्या मायेची पांखर मला ठाऊक नाहीं ! बहिणीच्या प्रेमाची सांवली मला मिळालेली नाहीं ! बंधुप्रेमाचं माधुर्य मला कधींच चाखायला मिळालं नाहीं ! म्हणून—"

तिला मध्येंच थांबवून कमलनें आश्चर्यानें विचारलें,

" म्हणजे ! तुझा वसंतदादा— "

" कमल, तें सर्व खोटं नाटक केलं मीं. जन्मापासून मला बंधुप्रेम कसं असतं त्याची यत्किंचित्‌हि कल्पना नाहीं ! "

" म्हणजे ! त्याचीं तुला येणारीं उत्कट स्नेहभावाचीं पत्रं— "

" कमल, तीं पत्रं माझा भाऊ मला लिहीत नसे; तर—"

" म्हणजे ? मग कुणाकडून येत असत तीं ? "

" बंधुप्रेमासाठीं हपापलेल्या माझ्या तृषार्त मनानं क्षणैक समाधानासाठीं उभं केलेलं तें एक चित्र होतं ! "

"मग तुला जीं वसंतदादाचीं पत्रं येत तीं कुणाचीं ?" कमलनें विचारलें.

पण त्याचें उत्तर देण्यापूर्वीच माझ्या तोंडून आश्चर्याचा प्रश्न गेला—

"म्हणजे ! तुझ्या विवाहाबद्दलचं व तुझ्या भावी यजमानांच्या अपघाताचं तें सर्व नाटकच समजायचं कीं काय ? "

" होय, मीने, माझ्या वेड्या अधिऱ्या मनाचा तो एक खेळ होता ! माझी काळजी घेईल असं एकच माणूस या जगांत होतं ! आणि तें म्हणजे माझ्या आईची एक म्हातारी मैत्रीण ! मी जी मधूनमधून जात असें, तें तिला भेटण्यासाठीं ! बिचारी मध्यंतरीं तीहि नवज्वराच्या तापानं वारली व मी जी तापानं रेसिडेन्सींत आलें होतें, तें तिच्या मृत्यूचा धक्का बसून ! आतां या जगांत मी एकटीच......"

आश्चर्यमुग्ध स्थितींत आम्ही ललितेचें पुढील बोलणें ऐकूं लागलों—

" मला जवळचे व प्रेमाचे असे आप्त नसल्यामुळें होणारा मनाचा कोंडमारा अगदीं असह्य झाला. आत्यंतिक औदासीन्यांत काळ कंठणाऱ्या माझ्या मनानं कल्पनेंत आनंद मानावयास सुरुवात केली व स्वतःच स्वतःला निरनिराळीं पत्रं लिहून अगर पार्सलं पाठवून मी माझ्या वेड्या मनाचं समाधान करून घेऊं लागलें आणि खरं म्हणाल तर या खोट्या नाटकापासून मला क्षणैक कां होईना पण सत्याभास होई व एक प्रकारचा सूक्ष्म आनंद मनाला मिळे. पण हें नाटक मी चालवणार तरी कुठवर ? साहजिकच कल्पनेच्या खेळावर उभारलेल्या या नाटकाचा माझ्या मनावर फार ताण पडला व आतां तो ताण सहन करण्याची शक्ति मला उरलेली नाहीं ! खरंच तुमची वंचना केल्याबद्दल— "

पण तिचें वाक्य पूर्ण होण्यापूर्वी मीं आश्चर्यानें विचारलें,

"पण ललिते, तुझ्या आईची काय हकीगत ?"

"माझी आई मी सात वर्षांची असतांना वारली आणि मरतांना तिनं आपल्या एका मैत्रिणीला–जिला मी मावशी म्हणत असें व जी नवज्वरानं मध्यंतरीं गेली–माझा प्रतिपाळ करण्यास सांगितलं व तिजजवळ आपली संपत्ति ठेवली. तिच्या मैत्रिणीनं व माझ्या परमपूज्य मावशीनं आपलं वचन पाळून तिच्या हवालीं केलेल्या संपत्तीपैकीं एक छदामहि स्वतःसाठीं न खर्चतां माझं उत्कृष्टपणानं संगोपन केलं व मला शिक्षण दिलं."

बरेंच आश्चर्य वाटून कमलनें प्रश्न केला–"म्हणजे ? तुझ्या वडिलांनीं नाहीं का तुला संभाळून शिक्षण दिलं ? ते कुठं आहेत ?"

त्यावर अत्यंत करुण नजरेनें आम्हांकडे पहात अडखळलेल्या स्वरांत ती उद्गारली, "कमल, मी एका नायकिणीची मुलगी असल्या......"

पण वाक्य संपण्यापूर्वीच तिला एक जबरदस्त हुंदका आला व उशींत तोंड खुपसून ती हमसाहमशीं रडूं लागली !